# श्रीमद्भगवद्गीता

## साधक-संजीवनी ( परिशिष्टसहित )

## मराठी-टीका



गीताप्रेस, गोरखपुर
GITA PRESS, GORAKHPUR

स्वामी रामसुखदास

॥ श्रीहरिः ॥

# नम्र निवेदन

विश्व-साहित्यामध्ये श्रीमद्भगवद्गीतेचे स्थान अद्वितीय आणि अलौकिक आहे. ही साक्षात् भगवंताच्या मुखातून प्रसारित झालेली परम रहस्यमय अशी दिव्य वाणी आहे. यात स्वतः भगवंतांनी अर्जुनास निमित्त करून मानवजातीच्या कल्याणासाठी उपदेश केला आहे. ह्या छोट्याशा ग्रंथामध्ये भगवंतांनी आपल्या हृदयातील अत्यंत विलक्षण भाव भरले आहेत की, ज्यांचा आत्तापर्यंत कोणालाही अंत लागू शकला नाही आणि लागणे शक्यही नाही.

आमचे परम श्रद्धेय श्री स्वामी रामसुखदासजी महाराजांनी ह्या अथांग गीता समुद्रात बुडी घेऊन अनेक गुह्यतम अमूल्य रत्ने शोधून काढली आहेत आणि ह्या ''साधक संजीवनी'' टीकेच्या माध्यमातून साधकांच्या कल्याणासाठी उदार हृदयाने वाटून दिली आहेत. गीतेच्या ह्या टीकेविषयी आमची अशी धारणा आहे की, ही टीका आम्हाला दुसऱ्या टीकांपेक्षा अत्यंत अद्वितीय, विलक्षण अलौकिक अशी वाटते. आम्हाला गीतेच्या दुसऱ्या टीकांचा एवढा अभ्यास नाही तरीपण या टीकेमधील अनेक श्लोकांतून प्रगट केलेले भाव अत्यंत विलक्षण आणि नवीन वाटले, जसे—

पहिल्या अध्यायाचा दहावा, एकोणीसावा, वीसावा आणि पंचवीसावा श्लोक; दुसऱ्या अध्यायाचा एकोणचाळीसावा, चाळीसावा श्लोक; तीसऱ्या अध्यायाचा तीसरा, दहावा, बारावा, तेरावा आणि त्रेचाळीसावा श्लोक; चौथ्या अध्यायाचा अठरावा आणि अडतीसावा श्लोक; पाचव्या अध्यायाचा तेरावा-चौदावा श्लोक; सहाव्या अध्यायाचा वीसावा आणि अडतीसावा श्लोक; सातव्या अध्यायाचा पाचवा आणि एकोणीसावा श्लोक; आठव्या अध्यायाचा सहावा श्लोक; नवव्या अध्यायाचा तीसरा आणि एकतीसावा श्लोक; दहाव्या अध्यायाचा एकेचाळीसावा श्लोक; अकराव्या अध्यायाचा सव्वीसावा, सत्तावीसावा आणि पंचेचाळीसावा, सेहेचाळीसावा श्लोक; बाराव्या अध्यायाचा बारावा श्लोक; तेराव्या अध्यायाचा पहिला, एकोणीसावा, वीसावा आणि एकवीसावा श्लोक; चौदाव्या अध्यायाचा तीसरा, बारावा, सतरावा आणि बावीसावा श्लोक; पंधराव्या अध्यायाचा सातवा आणि अकरावा श्लोक; सोळाव्या अध्यायाचा पाचवा आणि वीसावा श्लोक; सतराव्या अध्यायाचा सातवा, आठवा, नववा आणि दहावा श्लोक; अठराव्या अध्यायाचा सदतीसावा आणि त्र्याहत्तरावा श्लोक इत्यादी-इत्यादी. जर पाठक गांभीर्याने याचे अध्ययन करेल तर त्याला आणखी कोणत्याही इतर श्लोकातून थोडे-फार नवीन-नवीन भाव प्राप्त होऊ शकतात.

वर्तमान काळात प्रामुख्याने सरळ-सोप्या पद्धतीने साधनाचे तत्त्व विशद करणाऱ्या ग्रंथांचा अभाव जाणवतो. म्हणून योग्य मार्गदर्शन न मिळाल्याने साधकांना कठीण जात आहे. अशा स्थितीत परमात्म-प्राप्तीच्या अनेक सरळ उपायांनी युक्त साधकोपयोगी अनेक विशेष आणि मार्मिक गोष्टींनी शृंगारलेला तसेच अत्यंत सरळ आणि सुबोध भाषेत लिहिलेला हा प्रस्तुत ग्रंथ अत्यंत महत्त्वाच्या ठिकाणी विराजमान झाला आहे.

परमश्रद्धेय स्वामीजींनी गीतेची ही टीका कोणत्याही दार्शनिक दृष्टीकोनातून अथवा आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्यासाठी लिहिली नाही, तर साधकाचे हित कशा रीतीने होईल—या दृष्टीने लिहिली आहे. परमशांतीच्या इच्छुक साधकासाठी मग तो कोणत्याही देश, वेष, भाषा, मत, संप्रदाय इत्यादीचा का असेना, त्याच्यासाठी ही टीका संजीवनी औषधी समान आहे. या टीकेचे अध्ययन केल्यास हिंदू, बौद्ध, जैन, पारसी, ईसाई, मुसलमान इत्यादी सर्व धार्मिक अनुयायांना आपापल्या मतानुसारच उद्धाराचे उपाय मिळतील. आपल्या उद्देशाच्या सिद्धीसाठी साधकास या टीकेत आवश्यक ती पूर्ण सामुग्री मिळेल.

परमशांतीचे इच्छुक सर्व बंधु-भगिनींना नम्र निवेदन आहे की, त्यांनी या ग्रंथरत्नाचे मनःपूर्वक अध्ययन करावे आणि तत्त्व समजून घेऊन त्याला यथासाध्य आपल्या आचरणात आणण्याचा प्रयत्न करावा.

—प्रकाशक

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

# साधक-संजीवनी परिशिष्टाचे

## नम्र निवेदन

भगवान् अनन्त आहेत, त्यांचे सर्व काही अनन्त आहे, म्हणून त्यांच्या मुखारविन्दातून निघालेल्या गीतेच्या भावांचा अंत कसा येऊ शकतो? वेग-वेगळ्या अचार्यांनी गीतेवर वेग-वेगळी टीका लिहिली आहे. त्यांच्या टीकेनुसार अनुसरल्याने मनुष्याचे कल्याण तर होऊ शकते, परंतु तो गीतेचा अर्थ पूर्णपणे जाणू शकत नाही. आजपर्यंत जितक्या टीका लिहिल्या गेल्या आहेत, त्या सर्वच्या सर्व एकत्रित केल्या तरीही गीतेचा अर्थ पूर्ण होत नाही. जसे एखाद्या विहीरीचे पाणी असंख्य लोक शेकडो वर्षापासून घेत असले तरीही तिचे पाणी जसेच्या तसेच राहते, तसेच असंख्य टीका लिहिल्या गेल्या तरीही गीता जशीच्या तशीच राहते, तिच्या भावांचा अंत लागत नाही. विहीरीच्या पाण्याची तर सीमा आहे, परंतु गीतेच्या भावांची सीमा नाही. म्हणून गीतेच्या विषयात जो कोणी जे काही प्रतिपादन करतो तर तो वास्तविक स्वतःच्या बुद्धीचाच परिचय देतो—'**सब जानत प्रभु प्रभुता सोई। तदपि कहें बिनु रहा न कोई॥**' (मानस, बाल० १३। १)

भगवंताची वाणी मोठ-मोठ्या ऋषि-मुनींच्या वाणीपेक्षाही ठोस आणि श्रेष्ठ आहे, कारण भगवान् ऋषि-मुनींहूनही आदी आहेत—'**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः**' (गीता १०। २) म्हणून ऋषि-मुनी, संत महात्मा कितीही मोठे का असेनात आणि त्यांची वाणी कितीही श्रेष्ठ का असेना, परंतु ती भगवंताच्या दिव्यातिदिव्य वाणी 'गीते' ची बराबरी करू शकत नाही.

पाउल वाटेला 'पद्धती' म्हणतात आणि राजमार्ग, सरळमार्ग अथवा रुंद सडकेला 'प्रस्थान' म्हणतात. गीता, उपनिषद् आणि ब्रह्मसूत्र—हे तीन प्रस्थान आहेत, शेष सर्व 'पद्धती' आहेत. प्रस्थान त्रयात गीता फार विलक्षण आहे, कारण यात उपनिषद् आणि ब्रह्मसूत्र दोन्हींचे तात्पर्य येते.

गीता उपनिषदांचे सार आहे, परंतु वास्तविक गीतेची गोष्ट उपनिषदांपेक्षाही विशेष आहे. कारणापेक्षा कार्यात विशेष गुण असतो; जसे—आकाशाचा गुण केवळ एक 'शब्द' आहे, परंतु त्याचे कार्य असलेल्या वायूत दोन गुण 'शब्द आणि स्पर्श' आहेत.

वेद भगवंताचे निःश्वास आहेत आणि गीता भगवंताची वाणी आहे. निःश्वास तर स्वाभाविक असतात, परंतु भगवंतांनी गीता योगात स्थित होऊन सांगितली आहे.* म्हणून वेदांपेक्षाही गीता विशेष आहे.

सर्वच दर्शन गीतेच्या अंतर्गत आहेत, परंतु गीता कोणत्याही दर्शनाच्या अन्तर्गत येत नाही. दर्शन शास्त्रात जगत् काय आहे, जीव काय आहे आणि ब्रह्म काय आहे—हे शिकविले जाते. परंतु गीता शिकवित नाही तर अनुभव करविते.

गीतेत कोणत्याही मताचा आग्रह नाही तर केवळ जीवाच्या कल्याणाचाच आग्रह आहे. गीतेत मतभेद नाहीत, तर टीकाकारांमध्ये आहेत. गीतेनुसार अनुसरण केल्यास सगुण आणि निर्गुण उपासकांमध्ये परस्पर भांडण होऊ शकत नाही. गीतेत भगवंत साधकाला समग्राकडे घेऊन जातात. सगुण-निर्गुण, साकार-निराकार, द्विभुज, चतुर्भुज, सहस्रभुज इत्यादी सर्व रूपे समग्र परमात्म्याच्याच अन्तर्गत आहेत. समग्ररूपात कोणतेही रूप शिल्लक राहत नाही. कोणाचीही उपासना करा, संपूर्ण उपासना समग्ररूपाच्या अन्तर्गत येतात. संपूर्ण दर्शन समग्ररूपाच्या अन्तर्गत येतात. म्हणून सर्व काही परमात्म्याच्याच अन्तर्गत आहेत, परमात्म्याशिवाय किंचिन्मात्र काहीही नाही—याच भावात संपूर्ण गीता आहे.

गीतेचे तात्पर्य '**वासुदेवः सर्वम्**' यात आहे. एका परमात्मतत्त्वाशिवाय दुसरी सत्ता मानल्याने प्रवृत्तीचा उदय होतो आणि दुसऱ्या सत्तेची मान्यता मिटल्याने निवृत्तीची दृढता होते. प्रवृत्तीचा उदय होणे 'भोग' आहे आणि निवृत्तीची दृढता होणे 'योग' आहे. गीता 'सर्व काही परमात्मा आहे' अशी मानते आणि यालाच महत्त्व देते. संसारात कार्यरूपाने कारणरूपाने, प्रभावरूपाने, सर्व रूपामध्ये मीच मी आहे—हे सांगण्यासाठीच भगवंताने गीतेत चार ठिकाणी (सातव्या, नवव्या, दहाव्या आणि पंधराव्या अध्यायात) स्वतःच्या विभूतींचे वर्णन केले आहे. ब्रह्म (निर्गुण-निराकार), कृत्स्न अध्यात्म (अनन्त योनींतील अनन्त जीव), अखिल कर्म (उत्पत्ती-स्थिती-प्रलय इत्यादीच्या संपूर्ण क्रिया), अधिभूत (आपल्या शरीरासह

---

* न शक्यं तन्मया भूयस्तथा वक्तुमशेषतः॥

परं हि ब्रह्म कथितं योगयुक्तेन तन्मया। (महाभारत, अश्व० १६। १२-१३)

भगवान् म्हणाले—ते सर्वच्या सर्व त्याच रूपात आता पुन्हा सांगणे माझ्या अटोक्यातली गोष्ट नाही. त्यावेळी मी योगयुक्त होऊन परमात्मतत्त्वाचे वर्णन केले होते.

योगयुक्त अर्थात् योगात स्थित होऊन गीता सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, ऐकण्याऱ्याचे हित कशात आहे? त्याच्या हितासाठी काय सांगितले पाहिजे? भविष्यातही जो ऐकेल अथवा वाचेल, त्याचे हित कशाने होईल?—अशाप्रकारे सर्वच साधकांच्या हितामध्ये स्थित होऊन गीता सांगितली आहे.

संपूर्ण पंचभौतिक जगत्), अधिदैव (मन-इंद्रियांच्या अधिष्ठातृदेवतासह ब्रह्माजी इत्यादी सर्व देवता) आणि अधियज्ञ (अन्तर्यामी विष्णु आणि त्यांची रूपे)—हे सर्वचे सर्व '**वासुदेवः सर्वम्**' च्या अन्तर्गत येतात (सातव्या अध्यायाचा एकोणतीसावा-तीसावा श्लोक). तात्पर्य असे आहे की, सत्, असत् आणि त्याहून पलीकडे जे काही आहे ते सर्व परमात्माच आहे—'**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्**' (गीता ११। ३७). संसार आपल्या आसक्तीमुळेच दिसतो. आसक्तीमुळेच दुसरी सत्ता दिसते. आसक्ती नसेल तर एका परमात्म्याशिवाय काहीही नाही. जसे, भगवंताने म्हटले आहे—'**सर्वस्य चाहं हृदिसन्निविष्टः**' (गीता १५। १५) 'मीच संपूर्ण प्राण्यांच्या अंतः-करणात स्थित आहे.' ज्या अंत:करणात भगवंत राहतात, त्याच अंत:करणात राग-द्वेष, चलबिचल, अशांती असतात. अंत:करणातच सुख होते आणि अंत: करणातच दु:ख येते. समुद्र-मंथनात जेथून विष निघाले तेथूनच अमृत निघाले. भगवान् शंकराने विष प्राशन केले नंतर अमृत निघाले. त्याचप्रमाणे राग-द्वेष समाप्त झाले तर परमात्मा प्राप्त होतील. संत-महात्म्यांच्या अंत:करणात राग-द्वेष राहत नाहीत, म्हणून तेथे परमात्मा वास करतात.

सर्व काही परमात्माच आहेत—हे उघड्या नेत्रांचे ध्यान आहे. यात नेत्र झाकून घेण्याची आवश्यकता नाही (ध्यान), कान बंद करण्याची आवश्यकता नाही (नादानुसंधान), नाक बंद करण्याची आवश्यकता नाही (प्राणायाम). यात संयोगाचाही परिणाम होत नाही किंवा वियोगाचाही, कोणाच्या येण्यामुळे परिणाम होत नाही किंवा कोणाच्या जाण्यामुळे. जर सर्व काही परमात्माच आहे तर मग दुसरे कोठून येईल? कसे येईल?

गीता समग्राला स्वीकारते म्हणून गीतेचा आरंभ आणि अंत:शरणागतीत झाला आहे. शरणागतीनेच समग्राची प्राप्ती होते. परमात्म्याच्या समग्ररूपात सर्व रूपे असतानाही सगुणाची मुख्यता आहे. कारण सगुणाच्या अन्तर्गत तर निर्गुणही येते, परंतु निर्गुणात (गुणांचा निषेध असल्याने) सगुण येत नाही. म्हणून सगुणच समग्र होऊ शकते.

भगवान् श्रीकृष्ण समग्र आहेत—'**असंशयं समग्रं माम्**' (गीता ७। १). गीता समग्राची वाणी आहे, म्हणून गीतेत सर्व काही आहे. जो ज्या दृष्टीने गीतेला पाहतो, त्याला गीता तशीच दिसू लागते—'**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**' (गीता ४। ११).

कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—हे तीनच योग आहेत. शरीर (अपरा) याच्या अनुषंगाने कर्मयोग आहे, शरीरी (परा) याच्या अनुषंगाने ज्ञानयोग आहे आणि शरीर-शरीरी दोघांचे स्वामी (भगवान्) यांच्या अनुषंगाने भक्तियोग आहे. भगवंताने गीतेच्या आरंभी प्रथम शरीरीच्या अनुषंगाने आणि नंतर शरीराच्या अनुषंगाने क्रमाने ज्ञानयोग आणि कर्मयोगाचे वर्णन केले. त्यानंतर ध्यानयोगाचे वर्णन केले. कारण तेही कल्याण करण्याचे एक साधन आहे. पुढे सातव्या अध्यायापासून भक्तीचे विशेष रीतीने वर्णन केले, जे भगवंताचे मुख्य ध्येय आहे. मनुष्य कर्मयोगाने जगतासाठी, ज्ञानयोगाने स्वत:साठी आणि भक्तियोगाने भगवंतासाठी उपयोगी ठरतो.

गीतेत समतेला 'योग' म्हटले गेले आहे—'**समत्वं योग उच्यते**' (गीता २। ४८). वास्तविक 'योगाची आवश्यकता कर्मातच आहे, ज्ञानातही योगाची आवश्यकता नाही आणि भक्तीत तर योगाची मुळीच आवश्यकता नाही. ज्ञान आणि भक्ती वास्तविक 'योग' च आहेत. कर्म जड आहेत, बंधनात टाकणारे आहेत तसेच विषय आहेत, म्हणून त्यात योगाची आवश्यकता आहे—'**योगस्थः कुरु कर्माणि**' (गीता २। ४८). कर्मात योगच मुख्य आहे—'**योगः कर्मसु कौशलम्**' (गीता २। ५०). योगाशिवाय कर्म काही नाही—'**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय**' (गीता २। ४९). कर्तृत्वसुद्धा कर्म करण्यानेच येते. म्हणून गीतेत 'योग' शब्द विशेषकरून 'कर्मयोग' याचाच वाचक येतो. गीतेच्या पुष्पिकेतही '**योगशास्त्रे**' पदाचा अर्थ कर्मयोगाची शिकवण आहे.

कर्मयोगात दोन विभाग आहेत—कर्मविभाग आणि योगविभाग. कर्मविभाग पूर्वार्ध आहे आणि योगविभाग उत्तरार्ध आहे. कर्म करणसापेक्ष आहे आणि योग करणनिरपेक्ष आहे. कर्मविभागात कर्तव्य परायणता आहे आणि योगविभागात स्वाधीनता, निर्विकारता, असंगता, समता आहे. संसारात आपले जे कर्तव्य असते, तो दुसऱ्याचा अधिकार असतो. म्हणून व्यक्तीचे जे कर्तव्य आहे, तो परिवाराचा, समाजाचा आणि संसाराचा अधिकार आहे. जसे, वक्त्याचे जे कर्तव्य आहे, तो श्रोत्याचा अधिकार आहे आणि श्रोत्याचे जे कर्तव्य आहे, तो वक्त्याचा अधिकार आहे. वक्ता बोलून श्रोत्याच्या अधिकाराचे रक्षण करतो आणि श्रोता ऐकून वक्त्याच्या अधिकाराचे रक्षण करतो. दुसऱ्याच्या अधिकाराचे रक्षण केल्याने मनुष्य ऋणमुक्त होतो आणि त्याला 'योग' प्राप्त होतो. दुसऱ्याच्या अधिकाराचे रक्षण करण्याचे तात्पर्य असे आहे—शरीर, पदार्थ, योग्यता आणि सामर्थ्य यांना आपले न समजता, उलट दुसऱ्यांचेच समजून दुसऱ्यांच्या सेवेत अर्पण करणे.

संसारात पदार्थ आणि व्यक्तीशी आपला संयोग होत असतो. जेथे संयोग असतो तेथेच कर्तव्यपालन करण्याची आवश्यकता असते. पदार्थाचा संयोग झाल्यास त्या पदार्थात ममता न करता त्याचा सदुपयोग करणे, त्याला दुसऱ्यांच्या सेवेत लावणे आपले कर्तव्य आहे. व्यक्तीचा संयोग झाल्यास त्या व्यक्तीत ममता न करता तिची सेवा करणे, तिला सुख पोहचविणे आपले कर्तव्य आहे. कामना आणि ममतारहित होऊन कर्तव्यपालन केल्याने शरीर-संसाराच्या संयोगाचा वियोग होतो आणि योग प्राप्त होतो—'**तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसञ्ज्ञितम्**' (गीता ६। २३). संयोगाचा तर वियोग होतो, परंतु योगाचा कधी वियोग होत नाही. योगप्राप्ती झाल्यावर मनुष्य राग-द्वेष, काम-क्रोध इत्यादी विकारांपासून संपूर्णपणे मुक्त होतो आणि त्याला स्वाधीनता, निर्विकारता, असंगता आणि समतेची प्राप्ती होते.

प्रत्येक मनुष्याला असे वाटत असते की, मी सदा जिवंत रहावे, कधी मरू नये; मी सर्व काही जाणावे, कधी अज्ञानी राहू नये, मी सदा सुखी रहावे, कधी दुःखी राहू नये—असे प्रत्येक मनुष्य इच्छितो. परंतु मनुष्याची ही इच्छा स्वतःच्या सामर्थ्याने अथवा संसाराकडून कधी पूर्ण होऊ शकत नाही, कारण मनुष्य ज्याची इच्छा करतो ते संसाराजवळ नाहीच. वास्तविक मनुष्याला ज्याची इच्छा आहे ते त्याला पूर्वीपासूनच प्राप्त आहे. त्याच्याकडून ही चूक होत असते की, तो अशा वस्तूंची इच्छा करतो, ज्यांचा संयोग आणि वियोग होतो, ज्या मिळणाऱ्या आणि सोडून जाणाऱ्या असतात. जी वस्तू आपल्यापासून कधीही वेगळी असते, ती नेहमीसाठीच आपल्यापासून वेगळी असते आणि आत्ताही (वर्तमानात) आपल्यापासून वेगळी आहे—असा सिद्धांत आहे. जसे, शरीर कधीही आपल्यापासून वेगळे होईल तर ते नेहमीसाठीच आपल्यापासून वेगळे आहे आणि आत्ताही आपल्यापासून वेगळे आहे. त्याचप्रमाणे जी वस्तू (परमात्मा) कधीही आपल्यापासून वेगळी होत नाही, ती नेहमीसाठीच प्राप्त आहे आणि आत्ताही आपल्याला प्राप्त झालेली आहे. तात्पर्य हे निघाले की, वास्तविक संसाराचा नेहमीसाठीच वियोग आहे आणि परमात्म्याचा कायमचाच योग आहे.

काही आचार्य प्रथम कर्मयोग, नंतर ज्ञानयोग, त्यानंतर भक्तियोग—असा क्रम मानतात आणि काही आचार्य प्रथम कर्मयोग, नंतर भक्तियोग, त्यानंतर ज्ञानयोग—असा क्रम मानतात. परंतु गीता प्रथम ज्ञानयोग, नंतर कर्मयोग, त्यानंतर भक्तियोग—असा क्रम मानते. गीता कर्मयोगाला ज्ञानयोगापेक्षा विशेष मानते—'**तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते**' (५। २). कारण ज्ञानयोगाविना तर कर्मयोग होऊ शकतो—'**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः**' (३। २०), '**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते**' (४। २३), परंतु कर्मयोगाविना ज्ञानयोग होणे कठीण आहे—'**सन्न्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः**' (५। ६). श्रीमद्भागवतातही प्रथम ज्ञानयोग, नंतर कर्मयोग, त्यानंतर भक्तियोग—असा क्रम सांगितला गेला आहे.* अजून एक विलक्षण गोष्ट अशी आहे की, गीता कर्मयोग आणि ज्ञानयोग दोघांना समकक्ष आणि लौकिक सांगते—'**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा०**' (३। ३). क्षर (जगत्) आणि अक्षर (जीव)—दोन्ही लौकिक आहेत—'**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च**' (गीता १५। १६), परंतु भगवान् अलौकिक आहेत—'**उत्तमः पुरुषस्त्वन्यः**' (१५। १७). क्षराला अनुसरून कर्मयोग आणि अक्षराला अनुसरून ज्ञानयोग चालतो; म्हणून कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्ही लौकिक आहेत. परंतु भक्तियोग भगवंताच्या अनुषंगाने चालतो; म्हणून भक्तियोग अलौकिक आहे.

गीतेने भक्तियोगाला सर्वश्रेष्ठ म्हटले आहे (सहाव्या अध्यायाचा सत्तेचाळीसावा श्लोक). गीतेतील भक्ती भेद सांगणारी नाही तर अद्वैत भक्ती आहे. वास्तविक पाहिले तर ज्ञानात द्वैत आहे आणि भक्तीत अद्वैत आहे. कारण ज्ञानात तर जड-चेतन, जगत्-जीव, शरीर-शरीरी, असत्-सत्, प्रकृती-पुरुष इत्यादी दोन दोन आहेत, परंतु भक्तीत केवळ भगवान्च आहेत—'**वासुदेवः सर्वम्**' (गीता ७। १९), '**सदसच्चाहम्**' (गीता ९। १९). भगवंतांनी ज्ञानाच्या साधनांतसुद्धा भक्ती सांगितली आहे—'**मयि चानन्ययोगेन०**' (१३। १०) आणि गुणातीत होण्याचा उपायसुद्धा भक्ती सांगितली आहे—'**मां च योऽव्यभिचारेण०**' (१४। २६). ज्ञानाच्या परानिष्ठेतूनही पराभक्तीची प्राप्ती होते—'**मद्भक्तिं लभते पराम्**' (१८। ५५). या पराभक्तीपासून जाणणे, पाहणे आणि प्रवेश करणे—तिन्हींची प्राप्ती होते. (अकराव्या अध्यायाचा चौपन्नावा श्लोक). भगवान् आपल्या भक्ताला कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्हींची प्राप्ती करवितात (दहाव्या अध्यायाचा दहावा-अकरावा श्लोक). भगवंताने आपल्या भक्ताला सर्वापेक्षा उत्तम योगी म्हटले आहे—'**स मे युक्ततमो मतः**' (६। ४७), '**ते मे युक्ततमामताः**' (१२। २), '**स योगी परमो मतः**' (६। ३२). ध्यानयोगातही भक्ती आली आहे—'**युक्त आसीत मत्परः**' (६। १४). कर्मयोगातही भगवंताने भक्ती सांगितली आहे—'**युक्त आसीत मत्परः**' (२। ६१). भगवंताने सर्वच

---

* योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया।
ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित्॥ (श्रीमद्भा० ११। २०। ६)

योगांत आपली भक्ती (परायणता) सांगितली आहे, ही भक्तीची विशेषता आहे. अर्जुनाचा प्रश्न भक्तिविषयक नव्हता तरीही भगवंताने स्वत: भक्तीचे वर्णन केले. (अठराव्या अध्यायाचा छपन्नाव्यापासून सहासष्टाव्या श्लोकापर्यंत) भक्तीने समग्र परमात्म्याची प्राप्ती होते (सातव्या अध्यायाचा एकोणतीसावा- तीसावा श्लोक)

गीतेचा सातवा, नववा आणि पंधरावा अध्याय, दहाव्या अध्यायाचा आरंभ आणि अठराव्या अध्यायाच्या छपन्नाव्यापासून सहासष्टाव्यापर्यंतचे श्लोक मला फारच विलक्षण दिसतात. यात **'अर्जुन उवाच'** नाही अर्थात् हे श्लोक भगवंताने स्वत:हून अत्यंत कृपा करून सांगितले आहेत.

गीतेत कर्मयोगाच्या वर्णनात ज्ञानयोग-भक्तियोगाची, ज्ञानयोगाच्या वर्णनात कर्मयोग-भक्तियोगाची आणि भक्तियोगाच्या वर्णनात कर्मयोग-ज्ञानयोगाची गोष्टही येते. याचे तात्पर्य असे आहे की, साधकाने कोणताही योग केला तरी त्याला तिन्ही योगाची प्राप्ती होते अर्थात् त्याला मुक्ती आणि भक्ती—दोन्ही प्राप्त होतात. कारण परा आणि अपरा—दोन्ही प्रकृती भगवंताच्याच आहेत. ज्ञानयोग पराला अनुसरून आणि कर्मयोग अपराला अनुसरून चालतो. म्हणून कोण्या एका योगाची पूर्णता झाल्यास तिन्ही योगांची पूर्णता होते. परंतु यात एक शर्त अशी आहे की, साधकाने आपल्या मताचा आग्रह ठेवू नये आणि दुसऱ्याच्या मताचे खंडण अथवा निंदा करू नये, दुसऱ्याच्या मताला कनिष्ट मानू नये. स्वत:च्या मताचा आग्रह राहिल्यास आणि दुसऱ्याच्या मतास कनिष्ट मानून त्याचे खंडण अथवा निंदा केल्यास साधकाला मुक्ती (तत्त्वज्ञान) तर प्राप्त होऊ शकते परंतु भक्तीची (परम प्रेमाची) अर्थात् समग्रतेची प्राप्ती होऊ शकत नाही.

## परिशिष्टाच्या संबंधात

श्रीमद्भगवद्गीता एक असा विलक्षण ग्रंथ आहे, ज्याचा आजपर्यंत कोणाला पार लागू शकला नाही, पार लागू शकत नाही, पार लागू शकणार नाही आणि पार लागू शकतच नाही. खोल उतरून हिचे अध्ययन-मनन केल्यास नित्य नव-नवीन विलक्षण भाव प्रकट होत राहतात. गीतेत जितका भाव भरला आहे, तितका बुद्धीत येत नाही. जितका बुद्धीत येतो, तितका मनात येत नाही. जितका मनात येतो, तितका सांगण्यात येत नाही. जितका सांगण्यात येतो, तितका लिहिण्यात येत नाही. गीता असीम आहे, परंतु तिची टीका सीमितच असते. माझ्या अंत:करणात गीतेचे जे भाव आले होते, ते पूर्वी 'साधक-संजीवनी' टीकेत लिहिले होते. परंतु त्यानंतरही विचार केल्यास भगवत्कृपा आणि संत कृपेने गीतेचे नव-नवीन भाव प्रकट होत गेले. त्यांना आता 'परिशिष्ट भाव' च्या रूपात 'साधक-संजीवनी' टीकेत जोडले जात आहे.

'साधक-संजीवनी' टीका लिहितेवेळी माझ्या समजूतीत निर्गुणाची मुख्यता राहिली, कारण माझ्या शिकण्यात निर्गुणाचे प्राधान्य राहिले आणि विचारही त्याचाच केला.परंतु निष्पक्ष होऊन खोल विचार केल्यावर मला भगवंताच्या सगुण (समग्र) स्वरूपाचे आणि भक्तीचे प्राधान्य लक्षात आले. केवळ निर्गुणाची मुख्यता मानल्याने सर्वच बाबींचे योग्य समाधान होत नाही. परंतु केवळ सगुणाची मुख्यता मानल्याने कोणताही संशय शिल्लक राहत नाही. समग्रता सगुणातच आहे, निर्गुणात नाही. भगवंतानेही सगुणालाच समग्र म्हटले आहे—**'असंशयं समग्रं माम्'** (गीता ७। १)

परिशिष्ट लिहिल्यावरही अजून मला पूर्ण संतोष झाला नाही आणि मी गीतेवर विचार करणे बंद केले नाही. म्हणून पुढे भगवत्कृपेने आणि संतकृपेने कोण-कोणते नवीन भाव प्रगट होतील—हे माहित नाही. परंतु मानव-जीवनाची पूर्णता भक्तीच्या (प्रेमाच्या) प्राप्तीतच आहे—यात मला किंचिन्मात्रही संशय नाही.

पूर्वी 'साधक-संजीवनी' टीकेत श्लोकांचे अर्थ अन्वयपूर्वक न केल्याने त्यात कुठे-कुठे उणीव राहून गेली होती. आता श्लोकांचा अन्वयपूर्वक अर्थ देऊन त्या उणीवेची पूर्तता केली गेली आहे. अन्वयार्थात कुठे अर्थाला अनुसरून आणि कुठे वाक्याच्या सौंदर्याला अनुसरून विशेष विचारपर्वक परिवर्तन केले गेले आहे.

पाठकांना पूर्वीच्या आणि नंतरच्या (परिशिष्टाच्या) व्याख्येत कोणता फरक दिसला तर त्यांनी नंतरच्या व्याख्येचा भावच ग्रहण करावा. पूर्वीपेक्षा नंतर लिहिलेल्या विषयाचे अधिक महत्त्व असते असा सिद्धांत आहे. यात ह्या गोष्टीकडे विशेष लक्ष दिले गेले आहे की, साधकांचे कोणत्याही प्रकाराने अहित न व्हावे. कारण ही टीका मुख्यरूपाने साधकांच्या हिताच्या दृष्टीने लिहिली गेली आहे, विद्वत्तेच्या दृष्टीने नव्हे.

साधकांनी स्वत:चा कोणताही आग्रह न ठेवता ही टीका वाचावी आणि यावर सखोल विचार करावा म्हणजे वास्तविक तत्त्व त्यांना समजून येईल आणि जी गोष्ट टीकेत आली नसेल, तीही समजून येईल!

विनीत—

**स्वामी रामसुखदास**

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# कृष्णं वन्दे जगद्गुरुम्

पराकृतनमद्बन्धं परं ब्रह्म नराकृति। सौन्दर्यसारसर्वस्वं वन्दे नन्दात्मजं महः ॥
प्रपन्नपारिजाताय तोत्त्रवेत्रैकपाणये। ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥
वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम्। देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥

वंशीविभूषितकरान्नवनीरदाभात्
पीताम्बरादरुणबिम्बफलाधरोष्ठात्।
पूर्णेन्दुसुन्दरमुखादरविन्दनेत्रात्
कृष्णात् परं किमपि तत्त्वमहं न जाने ॥

भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोत्पला
शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला।
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी
सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥

एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतमेको देवो देवकीपुत्र एव।
एको मन्त्रस्तस्य नामानि यानि कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा ॥

॥ श्रीहरिः ॥

# विषयानुक्रमणिका

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

# पूर्वकथन

वंशीधरं तोत्त्रधरं नमामि मनोहरं मोहहरं च कृष्णम्।
मालाधरं धर्मधुरन्धरं च पार्थस्य सारथ्यकरं च देवम्॥
कर्तव्यदीक्षां च समत्वशिक्षां ज्ञानस्य भिक्षां शरणगतिं च।
ददाति गीता करुणार्द्रभूता कृष्णेन गीता जगतो हिताय॥
संजीवनी साधकजीवनीयं प्राप्तिं हरेर्वै सरलं ब्रवीति।
करोति दूरं पथिविघ्नबाधां ददाति शीघ्रं परमात्मसिद्धिम्॥*

## गीतेचे माहात्म्य

श्रीमद्भगवद्गीतेचे माहात्म्य अगाध आणि असीम आहे. हा भगवद्गीता ग्रंथ प्रस्थानत्रयीमध्ये मानला जातो. मानव जातीच्या उद्धाराचे तीन राजमार्ग ''प्रस्थानत्रय'' या नावाने सांगितले जातात. त्यापैकी ''उपनिषद्'' या नावाचा एक वैदिक मार्ग आहे. दुसरा दार्शनिक मार्ग आहे त्याला ''ब्रह्मसूत्र'' असे म्हणतात आणि एक स्मार्त मार्ग आहे त्याला ''भगवद्गीता'' असे म्हणतात. उपनिषदामध्ये ''मंत्र'' आहेत. ब्रह्मसूत्रामध्ये ''सूत्रे'' आहेत आणि गीतेमध्ये ''श्लोक'' आहेत. भगवद्गीतेमध्ये श्लोक असूनही प्रत्यक्ष भगवंताची ''वाणी'' असल्यामुळे हे मंत्रच आहेत. ह्या श्लोकामध्ये अत्यंत गहन असा अर्थ भरलेला असल्यामुळे त्यांना ''सूत्रे'' ही म्हटले जाते. ''उपनिषद्'' अधिकारी मनुष्यांच्या उपयोगाचे तत्त्व आहे. ''ब्रह्मसूत्र'' विद्वानांच्या उपयोगाचे तत्त्व आहे. परन्तु भगवद्गीता सर्वांच्या उपयोगाचे ज्ञान आहे.

भगवद्गीता हा एक अत्यंत अलौकिक आणि वैचित्र्यपूर्ण ग्रंथ आहे. साधक कोणत्याही देशाचा, वेषाचा, समुदायाचा, सांप्रदायाचा, वर्णाचा, आश्रमाचा असला तरीही त्याच्या उपयोगी पडणारी संपूर्ण साधन सामुग्री ह्या ग्रंथात आहे. कारण की, गीतेमध्ये कोणत्याही सांप्रदायाची निंदा अथवा स्तुती केलेली नाही तर वास्तविक तत्त्वाचेच वर्णन केले आहे. वास्तविक तत्त्व (परमात्मा) तेच आहे की, जे परिवर्तनशील, प्रकृती आणि प्रकृतिजन्य पदार्थापासून सर्वथैव अतीत आणि संपूर्ण देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीमध्ये नित्य, निरंतर एकरस व एकरूप राहणारे आहे. जो मनुष्य ज्या ठिकाणी आहे व जसा आहे वास्तविक तत्त्व त्या ठिकाणी तसेच पूर्ण विद्यमान आहे. परंतु परिवर्तनशील असलेल्या प्रकृतिजन्य वस्तू, व्यक्तीमध्ये राग आणि द्वेषामुळे त्याचा अनुभव येत नाही. संपूर्णपणे रागद्वेषरहित झाल्यानंतर त्याचा स्वाभाविकच अनुभव येतो.

भगवद्गीतेमधील उपदेश महान आणि अलौकिक आहे. गीतेवर अनेक भाष्ये झालेली आहेत आणि होत आहेत, तरीही संत, महात्मे, विद्वानांच्या मनामध्ये गीतेचे नव-नवीन भाव प्रकट होत असतात. ह्या तात्त्विक ग्रंथावर कितीही सखोल विचार केला तरीपण त्याचा कुणालाही अंत लागणे शक्य नाही. ह्या ग्रंथ समुद्रामध्ये जितके जितके खोल जावे तितके तितके गहन विचार (संकेत) मिळत जातात. जेथे एखाद्या चांगल्या विद्वान पुरुषाच्या भावांचा लवकर अंत लागत नाही; तेथे ज्याचे नाम, रूप इत्यादी सर्वच अनंत आहेत, अशा भगवंताने सांगितलेल्या वचनामध्ये भरलेल्या भावांचा अंत कसा लागेल?

ह्या लहानशा ग्रंथामध्ये इतकी विलक्षणता भरलेली आहे की आपल्या वास्तविक कल्याणाची इच्छा करणारा मनुष्य, मग तो कोणत्याही वर्ण, आश्रम, देश, साम्प्रदाय, मत इत्यादींचा का असेना, ह्या ग्रंथाचे अध्ययन केल्याबरोबर ग्रंथाकडे आकर्षित

* 'जे आपल्या हातात बासरी आणि चाबुक, तसेच गळ्यात दिव्य माळा धारण केलेले आहेत आणि जे प्राण्यांचे मन आणि मोह यांना हरण करणारे आहेत, अशा पार्थसारथी, धर्मधुरंधर, दिव्यस्वरूप भगवान् श्रीकृष्णांना मी प्रणाम करतो.'

'भगवान् श्रीकृष्णद्वारा गायीलेली करुणापूर्ण गीता जगताच्या हितासाठी कर्तव्य दीक्षा, समता शिकवण, ज्ञान भीक्षा आणि शरणागतीचे तत्त्व प्रदान करणारी आहे.'

'परमात्मप्राप्ती सरळ करविणारी आणि साधकांचे जीवन ही 'साधक-संजीवनी' साधन मार्गातील विघ्न-बाधांना दूर करून शीघ्रच परमात्मप्राप्तीरूप परमसिद्धी प्रदान करणारी आहे.'

होतो. जर मनुष्य अगदी थोड्या प्रमाणात या ग्रंथाचे पठन-पाठन करील तर त्याला आपल्या उद्धारासाठी अत्यंत संतोषदायक उपाय (मार्ग) मिळतील. प्रत्येक दर्शनाचे (मार्गाचे) निरनिराळे अधिकारी असतात परंतु गीतेची ही विलक्षणता आहे की, आपला उद्धार इच्छिणारे सर्वचे सर्व हिचे (गीतेचे) अधिकारी आहेत.

गीतेमध्ये साधनांचे वर्णन करण्याबाबत, विस्तारपूर्वक समजाविण्याबाबत एका एका साधनेचे अनेक वेळा कथन करण्यात संकोच केलेला नाही. तरीही ग्रंथाचा आकार प्रमाणापेक्षा मोठा झाला नाही. असा संक्षिप्त, परंतु विस्तारपूर्वक, यथार्थ आणि पूर्णपणे विवेचन करणारा दुसरा ग्रंथ दिसत नाही. आपल्या कल्याणाची उत्कट अभिलाषा असणारा मनुष्य कोणत्याही परिस्थितीमध्ये परमात्मतत्त्वाला प्राप्त करू शकतो. युद्धासारख्या भयंकर परिस्थितीमध्ये देखील आपले कल्याण करून घेऊ शकतो. अशा प्रकारे व्यवहारामध्ये राहूनही परमार्थ प्राप्तीची कला गीतेमध्ये शिकविली आहे. त्यामुळे गीतेची बरोबरी करू शकणारा दुसरा कोणताही ग्रंथ दिसत नाही.

गीता हा एक प्रासादिक ग्रंथ आहे. याचा आश्रय घेऊन पाठ केले असता अत्यंत विलक्षण, अलौकिक आणि शांती प्रदान करणारे भाव स्फुरण पावतात. याचे मनःपूर्वक पठन केल्यास परमशांती मिळते. ह्याचा एक विधी असा आहे की प्रथम गीतेचे संपूर्ण श्लोक अर्थासह कण्ठस्थ करावेत नंतर एकांतात बसून गीतेच्या "**यत्र योगेश्वरः कृष्णः**" ह्या शेवटच्या श्लोकापासून गीतेच्या "**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे**" ह्या पहिल्या श्लोकापर्यंत पुस्तकावाचून उलटा पाठ केल्यास परमशांती मिळते. जर दररोज गीतेचा एकवेळा किंवा अनेक वेळा पूर्ण पाठ केल्यास गीतेचे विशेष अर्थ स्फुरतात. मनामध्ये कोणत्याही प्रकारची शंका असल्यास पाठ करता करताच तिचे निरसन होते.

वास्तविक ह्या ग्रंथाचे माहात्म्य वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाही. अपार महिमा असणाऱ्या या ग्रंथाचे माहात्म्य कोण वर्णन करू शकतो?

## —गीतेचे प्रमुख उद्दिष्ट—

गीतेमध्ये कोणत्याही प्रकारचा "वाद" नाही अर्थात् द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैताद्वैत, विशुद्धाद्वैत, अचिन्त्य भेदाभेद इत्यादी कोणत्याही प्रकारचा वाद, एखाद्या सांप्रदायाच्या एखाद्या सिद्धान्ताचे वर्णन नाही. गीतेचे प्रमुख उद्दिष्ट हेच आहे की, मनुष्य कोणताही वाद, मत, सिद्धांत मानणारा का असेना, त्याचे कोणत्याही परिस्थितीमध्ये कल्याण व्हावे, कोणत्याही परिस्थितीमध्ये तो परमात्मप्राप्तीपासून वंचित राहू नये, कारण प्राणीमात्राचा जन्म मनुष्ययोनीमध्ये केवळ आपल्या कल्याणाकरिताच झालेला आहे. जगामध्ये मनुष्यांचे कल्याण होणार नाही अशी एकही परिस्थिती नाही. कारण परमात्मतत्त्व प्रत्येक परिस्थितीमध्ये समानरूपाने विद्यमान आहे. म्हणून साधकासमोर कोणतीही आणि कशीही परिस्थिती येवो तिचा केवळ सदुपयोग करावयाचा आहे. सदुपयोग करण्याचा अर्थ आहे—दुःखदायक परिस्थिती प्राप्त झाली तर सुखाच्या इच्छेचा त्याग करणे आणि सुखदायी परिस्थिती प्राप्त झाली तर "सुखोपभोगाचा" आणि "परिस्थिती अशीच कायम टिकून राहो" या इच्छेचा त्याग करणे आणि तिला दुसऱ्याची सेवा करण्यामध्ये लावणे. अशा प्रकारे सदुपयोग केल्यास मनुष्य सुखकारक आणि दुःखकारक या दोन्हीही परिस्थितीहून वर उठतो अर्थात् त्याचे कल्याण होते.

सृष्टीच्या आरंभी "मी एकच अनेक रूपाने प्रकट व्हावे" असा भगवंताच्या मनात संकल्प झाला. या संकल्पाने एकच परमात्मा प्रेमवृद्धीच्या लीलेसाठी प्रेमाची देवाण-घेवाण करण्यासाठी स्वतःच श्रीकृष्ण आणि लक्ष्मीजी (श्रीराधा) ह्या दोन रूपामध्ये प्रकट झाला. त्या दोघांनी परस्पर क्रीडा (लीला) करण्यासाठी एका खेळाची रचना केली. त्या खेळासाठी भगवंताच्या संकल्पाने अनंत जीव (जे अनादिकालापासून विद्यमान होते) आणि खेळाच्या पदार्थांची (शरीर इत्यादी) सृष्टी निर्माण झाली. दोन्हीही बाजूकडील खेळाडू जेव्हा स्वतंत्र असतील तेव्हाच खेळ होतो. म्हणून भगवंतांनी जीवांना स्वातंत्र्य प्रदान केले. त्या खेळामध्ये श्री लक्ष्मीजीचे (श्री राधेचे) फक्त भगवंताकडेच आकर्षण होते. त्यांना खेळामध्ये भगवंताविषयी भूल (विसर) पडली नाही. म्हणून श्रीलक्ष्मीजी व भगवंत यांच्यामध्ये प्रेमवृद्धीची लीला झाली. परंतु जे दुसरे जीव होते त्यांनी भगवंताला विसरून संयोगजन्य सुखासाठी खेळातील पदार्थासोबत (उत्पत्ती आणि विनाश पावणारे प्रकृतिजन्य पदार्थ) आपला संबंध मानला आणि त्यामुळेच ते जन्ममरणाच्या फेऱ्यात पडले.

खेळातील पदार्थ फक्त खेळासाठीच असतात कोणाचे व्यक्तिगत नसतात. परंतु ते जीव खेळ खेळण्याचे तर विसरून गेले आणि मिळालेल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करून खेळातील पदार्थांना अर्थात् शरीरादिकांना व्यक्तिगत मानू लागले. म्हणून ते त्या पदार्थांच्या ठिकाणीच आसक्त झाले आणि भगवंताला सर्वथैव विसरून गेले (विन्मुख झाले). आता जर ते जीव शरीरादी (उत्पत्ति-विनाशशील) पदार्थांना विन्मुख होऊन भगवंताला सम्मुख होतील तर ते जन्ममरणरूपी महान दुःखापासून कायमची सुटका प्राप्त करून घेतील. म्हणून जीवांनी संसाराला विन्मुख होऊन भगवंताशी सम्मुख व्हावे आणि भगवंतासोबत असलेला आपला नित्य संबंध ओळखून घ्यावा. यासाठीच श्रीमद्‌भगवद्गीतेचा अवतार झाला आहे.

# —गीतेमधील योग—

गीतेमध्ये ''योग'' या शब्दाचे फार विलक्षण अर्थ आहेत. त्याचे आपण तीन विभाग करू शकतो-

(१) 'युजिर् योगे' या धातूने बनलेल्या 'योग' शब्दाचा अर्थ ''समरूप परमात्म्याबरोबर नित्य संबंध'' जसे 'समत्वं योग उच्यते' (२।४८) इत्यादी. हाच अर्थ गीतेमध्ये प्रामुख्याने आला आहे.

(२) 'युज् समाधौ' या धातूने बनलेल्या 'योग' शब्दाचा अर्थ ''चित्ताची स्थिरता'' अर्थात् ''समाधीत स्थिती'' जसे ''यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया'' (६।२०) इत्यादी.

(३) 'युज् संयमने' या धातूने बनलेल्या 'योग' शब्दाचा अर्थ ''संयमन, सामर्थ्य, प्रभाव'' जसे 'पश्य मे योगमैश्वरम्' (९।५) इत्यादी.

गीतेमध्ये ज्या ज्या ठिकाणी ''योग'' शब्द आला आहे त्यामध्ये उपरोक्त तीन अर्थापैकी एका अर्थाची प्रमुखता आणि दुसऱ्या दोन अर्थांची गौणता आहे. ज्याप्रमाणे 'युजिर् योगे' च्या 'योग' शब्दामध्ये समता (संबंध) ची प्रमुखता आहे परंतु समता आल्यानंतर स्थिरता आणि सामर्थ्य* सुद्धा आपोआपच येतात. ''युज् समाधौ'' च्या 'योग' शब्दामध्ये स्थिरतेची प्रमुखता आहे परंतु स्थिरता आल्यानंतर समता आणि सामर्थ्यही आपोआपच येतात. ''युज् संयमने'' च्या 'योग' शब्दामध्ये सामर्थ्याची प्रमुखता आहे परंतु सामर्थ्य आल्यानंतर समता आणि स्थिरताही आपोआपच येते. म्हणून गीतेमधील 'योग' शब्द अत्यंत व्यापक आणि गंभीर अर्थाचा आहे.

पातञ्जलयोगदर्शनामध्ये ''चित्तवृत्तीचा निरोध'' करण्याला 'योग' हे नामाभिधान आहे. ''योगश्चित्तवृत्तिनिरोधः'' (१।२) आणि द्रष्ट्याची स्वरूपामध्ये स्थिती होणे असा त्या योगाचा परिणाम सांगितला आहे. ''तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्'' (१।३) अशा प्रकारे पातञ्जलयोगदर्शनामध्ये योगाचा जो परिणाम सांगितला आहे त्यालाच गीतेमध्ये 'योग' म्हटले आहे. (२।४८, ६।२३) तात्पर्य हे आहे की, गीता चित्तवृत्तीशी सर्वथा संबंध-विच्छेदपूर्वक स्वयंसिद्ध सम- स्वरूपामध्ये स्वाभाविक स्थितीला ''योग'' म्हणते. त्या समतेमध्ये (नित्ययोग) स्थित झाल्यावर पुनः कधीही तिचा वियोग होत नाही, कधी वृत्तिरूपता होत नाही, कधी व्युत्थान होत नाही. चित्तवृत्तींचा निरोध झाल्यानंतर निर्विकल्प अवस्था प्राप्त होते. परंतु समतेमध्ये स्थित झाल्यावर ''निर्विकल्प बोध'' होतो. ''निर्विकल्प बोध'' अवस्थातीत आणि संपूर्ण अवस्थांचा प्रकाशक आहे.

समता अर्थात् नित्ययोगाचा अनुभव करविण्यासाठी गीतेमध्ये तीन योगमार्गाचे वर्णन केले आहे. कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन शरीरांचा संसाराशी अभिन्न संबंध आहे. म्हणून ह्या तिघांनाही दुसऱ्यांच्या सेवेमध्ये लावणे याला ''कर्मयोग'' म्हणतात. स्वतः यांच्यापासून अलग होऊन आपल्या स्वरूपामध्ये स्थित होणे याला ''ज्ञानयोग'' म्हणतात आणि स्वतः भगवंताला समर्पण होणे याला ''भक्तियोग'' म्हणतात

हे तीन योग सिद्ध करण्यासाठी अर्थात् आपला उद्धार करण्यासाठी मनुष्याला तीन शक्ती प्राप्त आहेत. (१) कार्य करण्याची शक्ती (बळ) (२) जाणून घेण्याची शक्ती (ज्ञान) आणि (३) मानण्याची शक्ती (विश्वास). कार्य करण्याची शक्ती (बळ) निःस्वार्थ भावनेने संसाराची सेवा करण्यासाठी आहे, तो ''कर्मयोग'' आहे. जाणण्याची शक्ती आपल्या स्वरूपाला जाणून घेण्यासाठी आहे, तो ''ज्ञानयोग'' आहे आणि मानण्याची शक्ती भगवंताला आपले आणि आपणाला भगवंताचे मानून भगवंताला सर्वथा समर्पित होण्यासाठी आहे, तो ''भक्तियोग'' आहे. ज्याला कार्य करण्यामध्ये आवड जास्त असते तो कर्मयोगाचा अधिकारी आहे. ज्याला आपण आपणाला जाणून घेण्याची जिज्ञासा अधिक असते तो ज्ञानयोगाचा अधिकारी आहे. ज्याचा भगवंतावर श्रद्धा आणि विश्वास जास्त आहे तो भक्तियोगाचा अधिकारी आहे. हे तिन्ही योगमार्ग परमात्मप्राप्तीची स्वतंत्र साधने आहेत. इतर सर्व साधने ह्या तिन्हीच्या अंतर्गत येतात.†

* भगवंताच्या ठिकाणी सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि लय करण्याचे जे सामर्थ्य आहे ते सामर्थ्य योग्यांचे ठिकाणी येत नाही. 'जगद्व्यापारवर्जम्' (ब्रह्मसूत्र ४।४।१७) योग्यांचे ठिकाणी जे सामर्थ्य येते त्या सामर्थ्याच्या योगाने योगी संसारमात्रावर विजय प्राप्त करतो (गीता ५।१९) अर्थात् कशीही अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली तरी सुद्धा योग्यावर त्याचा कोणताही परिणाम होत नाही.

† श्रीमद्भागवतात भगवंतांनी म्हटले आहे.

योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयो विधित्सया। ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योस्ति कुत्रचित्॥ (११।२०।६)

आपल्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या मनुष्यासाठी मी तीन योगमार्ग सांगितले आहेत. ज्ञानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग. या तिन्हीशिवाय दुसरा कोणताही कल्याणाचा मार्ग नाही.

हीच गोष्ट (विवेचन) अध्यात्मरामायण आणि देवीभागवतातही आढळते—

(१) मार्गास्त्रयो मया प्रोक्ताःपुरा मोक्षाप्तिसाधकाः। कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्च शाश्वतः॥ (अध्यात्म० ७।७।५९)

(२) मार्गास्त्रयो मे विख्याता मोक्षप्राप्तौ नगाधिप। कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्च सत्तम॥ (देवी० ७।३७।३)

जडतेशी संबंध विच्छेद करणे हे सर्व साधनांचे प्रमुख काम आहे. जडतेशी संबंध-विच्छेद करणाऱ्या साधनांमध्ये तर फरक असतो. परंतु जडतेशी संबंध-विच्छेद झाल्यावर सर्व साधने एक होतात अर्थात् सर्व साधनांनी शेवटी एकाच समरूप परमात्मतत्त्वाची प्राप्ती होते. या समरूप परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीलाच गीतेने 'योग' असे म्हटले आहे आणि यालाच 'नित्ययोग' असे म्हणतात.

गीतेमध्ये केवळ कर्मयोग, ज्ञानयोग अथवा भक्तियोगाचेच वर्णन झाले आहे असे नाही. यात उपरोक्त तीन योगाखेरीज यज्ञ, दान, तप, ध्यानयोग, प्राणायाम, हठयोग, लययोग इत्यादी साधनांचेही वर्णन केलेले आहे. याचे मुख्य कारण असे आहे की, गीतेमध्ये अर्जुनाचे प्रश्न युद्धाविषयी नाहीत तर कल्याणाविषयी आहेत आणि भगवंताकडून गीता सांगण्याचा उद्देश देखील युद्ध करविण्याचा मुळीच नाही. अर्जुन आपले निश्चित कल्याण इच्छित होते. (२।७,३।२,५।१) म्हणून जेवढी कल्याणकारक साधने शास्त्रामध्ये सांगितली गेली आहेत त्या सर्व साधनांचे गीतेमध्ये संक्षिप्तरूपाने विशद वर्णन केलेले आढळते. त्या साधनांमुळेच साधकलोकांमध्ये गीतेला विशेष आदर आहे. कारण साधक कोणत्याही मताचा, कोणत्याही सांप्रदायाचा, कोणत्याही सिद्धांताला मानणारा का असेना, परंतु आपले कल्याण तर सर्वांना अभीष्ट असतेच.

## —साधनांचे दोन प्रकार—

जीवामध्ये एक तर चेतन परमात्म्याचा अंश आहे आणि एक जड प्रकृतीचा अंश आहे. चेतनअंशाच्या प्राधान्याने तो परमात्म्याची इच्छा करतो आणि जड-अंशाच्या प्राधान्याने तो संसाराची इच्छा करतो. या दोन इच्छांपैकी परमात्म्याची इच्छा तर पूर्ण होणारी आहे परंतु संसाराची इच्छा कधीही पूर्ण होणारीच नाही. काही सांसारिक इच्छांची पूर्तता होत असलेली दिसत असूनही वास्तविक त्यांची निवृत्ती होत नाही; उलट संसाराच्या आसक्तीमुळे नवीन नवीन इच्छा निर्माण होत राहतात. वास्तविक सांसारिक इच्छांची पूर्तता अर्थात् सांसारिक वस्तूंची प्राप्ती इच्छेच्या अधीन नाही उलट कर्माच्या अधीन आहे परंतु परमात्म्याची प्राप्ती कर्माच्या अधीन नाही. स्वत:च्या उत्कट अभिलाषेनेच परमात्म्याची प्राप्ती होते. याचे कारण हे आहे की, प्रत्येक कर्माचा आदि (सुरुवात) आणि अंत (शेवट) असतो. त्यामुळे त्याचे फल देखील आदि आणि अंत असणारेच असते. म्हणून आदि आणि अंत असणाऱ्या कर्माने अनादी-अनंत परमात्म्याची प्राप्ती कशी होऊ शकेल? परंतु साधकांनी सर्वसाधारण असा समज करून घेतला आहे की, ज्याप्रमाणे क्रियांच्या प्रधानतेने सांसारिक वस्तूंची प्राप्ती होते तशीच परमात्म्याची प्राप्ती देखील त्याप्रमाणे क्रियांच्या प्रधानतेनेच होईल आणि जसे सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीसाठी शरीर, इन्द्रिये, मन, बुद्धीचे साहाय्य घ्यावे लागते तसे परमात्मप्राप्तीसाठी देखील त्याप्रकारे शरीर, इन्द्रिये, मन, बुद्धीचे साहाय्य घ्यावे लागेल. म्हणून असे साधक जडाच्या (शरीरादींच्या) मदतीने अभ्यास करीत परमात्म्याकडे वाटचाल करतात.

जसे ध्यानयोगामध्ये दीर्घकाळपर्यंत अभ्यास करीत करीत अर्थात् परमात्म्याचे ठिकाणी चित्त लावीत लावीत जेव्हा चित्ताचा निरोध होतो, तेव्हा त्यात संसाराची कोणतीही इच्छा न राहिल्यामुळे आणि स्वत: जड असल्याकारणाने परमात्म्याला ग्रहण न करू शकल्याने ते (चित्त) संसाराविषयी उपराम पावते. चित्ताच्या उपराम होण्याने साधकाचा चित्ताशी अर्थात् जडाशी सर्वथैव संबंध-विच्छेद होतो आणि तो स्वत:च परमात्मतत्त्वाचा अनुभव घेतो. (गीता ६।२०) परंतु जो साधक सुरवातीपासूनच परमात्म्याशी आपला स्वत:सिद्ध नित्य-संबंध मानून आणि जडतेशी आपला किंचिन्मात्रदेखील संबंध न मानता साधन करतो त्याला अत्यंत शीघ्र आणि सुगमतेने परमात्मतत्त्वाचा अनुभव येतो.

अशा प्रकारे परमात्मतत्त्वाची प्राप्ती इच्छिणाऱ्या साधकासाठी साधनाचे दोन प्रकार आहेत. ज्या प्रकारात अंत:करण प्रधान (मुख्य) असते, अर्थात् ज्यात साधक जडाचे साहाय्य घेऊन साधन करतो त्याला ''करणसापेक्ष प्रकार'' आणि ज्या प्रकारामध्ये स्वत:ची प्रधानता असते अर्थात् ज्यात साधक सुरवातीपासूनच जडाची साहाय्यता न घेता 'स्व' ने साधन करतो त्याला ''करणनिरपेक्ष प्रकार'' म्हणतात. जरी या दोन्हीही साधन प्रकारांनी परमात्मतत्त्वाची प्राप्ती करणनिरपेक्षतेने अर्थात् 'स्व' नेच (जडाचा संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यावर) होते. तरीपण करण-सापेक्ष प्रकार आचरल्याने त्याची प्राप्ती उशीराने होते आणि करण-निरपेक्ष प्रकार आचरल्याने त्याची प्राप्ती शीघ्रतेने होते. साधनांच्या या दोन प्रकारामध्ये चार मुख्य भेद आहेत—

(१) करणसापेक्ष प्रकारामध्ये जडतेचा (शरीर, इन्द्रिये, मन, बुद्धी) आश्रय घ्यावा लागतो, परंतु करणनिरपेक्ष प्रकारामध्ये जड पदार्थांचा आश्रय घ्यावा लागत नाही; तर

जडतेशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद करावा लागतो.

(२) करणसापेक्ष प्रकारामध्ये एक नवीन अवस्था निर्माण होते. परंतु करणनिरपेक्ष प्रकारामध्ये अवस्थांचा संबंध-विच्छेद होऊन अवस्थातीत तत्त्वाचा अनुभव होतो.

(३) करणसापेक्ष प्रकारात प्राकृत शक्तींची (सिद्धीची) प्राप्ती होते परंतु करणनिरपेक्ष प्रकारामध्ये प्राकृत शक्तींचा संबंध-विच्छेद होऊन सरळ परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो.*

(४) करणसापेक्ष प्रकारामध्ये कधीही तात्काळ सिद्धी प्राप्त होत नाही परंतु करणनिरपेक्ष प्रकारामध्ये जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यावर, आपल्या स्वरूपामध्ये स्थित झाल्यावर किंवा भगवंताला शरण गेल्यावर ताबडतोब सिद्धीची प्राप्ती होते.

पातञ्जलयोगदर्शनामध्ये तर योगसिद्धीसाठी करण-सापेक्ष प्रकाराला महत्त्व दिले गेले आहे. परंतु गीतेमध्ये योग-सिद्धीकरिता करणनिरपेक्ष प्रकारालाच महत्त्व दिले गेलेले आहे. परमात्म्याचे ठिकाणी मन लागले तर ठीकच आहे. परंतु मन नाही लागले तर सर्व व्यर्थ आहे, हा करणसापेक्ष प्रकार आहे. परमात्म्याचे ठिकाणी मन लागो अथवा न लागो, काही हरकत नाही. परंतु स्वत: परमात्म्यात लागणे हा करणनिरपेक्ष प्रकार आहे. तात्पर्य हे आहे की करणसापेक्ष प्रकारामध्ये परमात्म्याशी मन आणि बुद्धीचा संबंध आहे आणि करण-निरपेक्ष प्रकारामध्ये मन बुद्धीचा संबंध-विच्छेदपूर्वक परमात्म्याशी "स्व" चा संबंध आहे. म्हणून करणसापेक्ष प्रकारामध्ये अभ्यासद्वारा क्रमाने सिद्धी प्राप्त होते परंतु करण-निरपेक्ष प्रकारामध्ये अभ्यासाची आवश्यकता नाही. कारण "स्व" चा परमात्म्याशी स्वत:सिद्ध नित्य संबंध (नित्ययोग) आहे. म्हणून भगवंताशी आपला संबंध मानण्यात अथवा जाणण्यात अभ्यासाची आवश्यकता नाही. जसे लग्न झाल्यावर स्त्री पुरुषाला आपला पती मानते तर असे मानण्यासाठी तिला काही अभ्यास करावा लागत नाही. त्याचप्रमाणे कोणी दाखविले की "ही गंगा नदी आहे" तर ते जाणून घेण्यासाठी कसलाही अभ्यास करावा लागत नाही.† करणसापेक्ष प्रकारात तर आपल्याकरिताच (क्रिया) साधन करण्याची प्रमुखता असते परंतु करणनिरपेक्ष प्रकारात जाणण्याची (विवेकाची) आणि मानण्याची (भावाची) प्रधानता असते.

"माझा जडाशी (शरीर इत्यादी) संबंध नाहीच" असा अनुभव नसताना देखील जेव्हा साधक सुरवातीपासूनच याला दृढपणे मानतो तेव्हा त्याला असाच स्पष्ट अनुभव येतो. जसे तो "मी शरीर आहे आणि शरीर माझे आहे" असा चुकीचा समज करून बंधन पावला होता तसे "मी शरीर नाही आणि शरीर माझे नाही" अशी खरी मान्यता करून मुक्त होतो. कारण मानलेली गोष्ट न मानल्यामुळे नाहीशी होते हा सिद्धांत आहे. हीच गोष्ट भगवंतानी गीतेमध्ये सांगितली आहे की, अज्ञानी मनुष्य शरीराशी संबंध जोडून शारीरिक क्रियांचा कर्ता आपणालाच मानतो-"**अहंकार-विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**" (३।२७) परंतु ज्ञानी मनुष्य त्या क्रियांचा कर्ता स्वत:ला मानत नाही-"**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्**" (५।८) तात्पर्य हे झाले की अवास्तविक मान्यतेला नाहीशी करण्यासाठी वास्तविक मान्यता करणे आवश्यक आहे.

'मी हिंदु आहे' 'मी ब्राह्मण आहे' 'मी साधू आहे' इत्यादी मान्यता इतक्या दृढ असतात की, जोपर्यंत त्या मान्यतांना स्व सोडून देत नाही तोपर्यंत दुसरा कोणीही त्यांना सोडवू शकत नाही. तसेच मी शरीर आहे, मी कर्ता आहे, इत्यादी मान्यता देखील इतक्या दृढ होतात की साधकांना त्या सोडून देणे कठीण वाटते. परंतु ह्या लौकिक धारणा अवास्तविक, असत्य असल्यामुळे सदा टिकणाऱ्या नाहीत तर नष्ट होणाऱ्या आहेत. या उलट मी शरीर नाही, मी भगवंताचा आहे, इत्यादी धारणा वास्तविक आणि सत्य असल्याने त्या कधीही नष्ट होणाऱ्या नाहीत तर त्यांची विस्मृती होते, त्यांचेशी विमुखता होते. म्हणून वास्तविक धारणा दृढ झाल्यानंतर धारणारूपाने न राहता उलट बोधामध्ये (अनुभवात) परिणत होते.

जरी गीतेमध्ये करणसापेक्ष प्रकाराचे देखील वर्णन करण्यात आलेले आहे (जसे ४।२४-३०,३४,६।१०-

* जर करणसापेक्ष प्रकाराने (चित्तवृत्तिनिरोध) सरळ परमात्मतत्त्वाची प्राप्ती झाली असती तर पातञ्जलयोगदर्शनाचा 'विभूतिपाद' (ज्यामध्ये सिद्धीचे वर्णन आहे) व्यर्थ झाला असता. करणसापेक्ष प्रकाराने ज्या सिद्धीची प्राप्ती होते, त्या तर परमात्मतत्त्वप्राप्तीच्या मार्गामधील विघ्ने आहेत. पातञ्जल-योगदर्शनामध्ये देखील त्या सिद्धींना विघ्नरूपच मानले आहे. 'ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः' (३।३७) अर्थात् त्या सिद्धी समाधीच्या सिद्धीमधील विघ्ने आहेत आणि व्युत्थानात (व्यवहार) सिद्धी आहेत. 'स्थान्युपनिमंत्रणे सङ्गस्मयाकरणं पुनरनिष्टप्रसङ्गात्' (३।५१) अर्थात् लोकपाल देवतांनी (आपल्या लोकामधील भोगांची लालुच दाखवून) बोलावल्यानंतर त्या भोगाविषयी आसक्तीही धरू नये आणि अभिमानही बाळगू नये कारण असे केल्याने पुन्हा अनिष्ट (पतन) होण्याची शक्यता असते.

† वास्तविक परमात्म्याला मानण्या अथवा जाणण्याच्या विषयामध्ये संसारातील कोणताही दृष्टांत पुरा पडत नाही. कारण संसाराला मानण्या अथवा जाणण्यामध्ये तर मन आणि बुद्धी सोबतच असते. परंतु परमात्म्याला मानण्या अथवा जाणण्यामध्ये मन आणि बुद्धी बरोबर राहत नाही अर्थात् परमात्म्याचा अनुभव स्व ने होतो, मन बुद्धीने होत नाही. दूसरी गोष्ट अशी की, संसाराला मानण्या अथवा जाणण्याचा तर आरंभ आणि अंत होतो. परंतु परमात्म्याला मानण्या अथवा जाणण्याचा आरंभ आणि अंत होत नाही. कारण वास्तविक संसाराबरोबर आमचा (स्व) संबंध नाहीच, पण परमात्म्यासोबत आमचा संबंध नेहमीचाच आहे आणि नेहमीकरिताच राहील.

२८,८।८-१६,१५।११ इत्यादी) तरी प्रामुख्याने करण-निरपेक्ष प्रकाराचेच वर्णन झाले आहे. (जसे २।४८, ५५, ३।१७ ,४।३८,५।१२ चा पूर्वार्ध, ६।५,९।३०-३१,१२।१२,१८।६२,६६,७३ इत्यादी-इत्यादी) याचे कारण हे आहे की, भगवंत साधकांना लवकरात लवकर आणि सुगमतेने आपली प्राप्ती करून देऊ इच्छितात. दूसरी गोष्ट अशी आहे की, अर्जुनाने युद्धाची परिस्थिती प्राप्त झालेल्या काळात आपल्या कल्याणाचा उपाय विचारला आहे, म्हणून त्यांच्या कल्याणासाठी करणनिरपेक्ष प्रकारच उपयोगी पडू शकतो, कारण करणनिरपेक्ष प्रकारामध्ये मनुष्य प्रत्येक परिस्थितीमध्ये आणि संपूर्ण शास्त्रविहित कर्मे करीत असतानासुद्धा आपले कल्याण करू शकतो. या पद्धतीनुसार (अभ्यासाशिवाय) अर्जुनाचा मोह नाश झाला आणि त्याला स्मृती प्राप्त झाली. (१८।७३)

साधनेची ही करणनिरपेक्ष पद्धती सर्वांसाठी समान-रूपाने उपयोगी आहे. कारण त्यासाठी कोणती विशिष्ट योग्यता, परिस्थिती इत्यादीची आवश्यकता नाही. या प्रकारामध्ये केवळ परमात्मप्राप्तीची उत्कट अभिलाषा झाल्यानेच तात्काळ जडाचा संबंध-विच्छेद होऊन नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव येतो. जसे कितीही वर्षाचा अंधार असो एक दिवा लावल्याबरोबर नष्ट होतो, तसे जडाशी कितीही जुना (अनंत जन्मांचा) संबंध असो परमात्मप्राप्तीची उत्कट अभिलाषा झाल्याबरोबर तो नष्ट होतो. म्हणून उत्कट अभिलाषा करणसापेक्ष प्रकाराने साधणाऱ्या समाधीपेक्षाही श्रेष्ठ आहे. उत्तमात उत्तम निर्विकल्प समाधी असेल, त्यातून देखील व्युत्थान होते आणि नंतर व्यवहार होतो. अर्थात् समाधीचा देखील आरंभ आणि अंत होतो. जोपर्यंत आरंभ आणि अंत आहे तोपर्यंत जडाशी संबंध राहतोच. जडाशी संबंध-विच्छेद झाल्यावर साधनेचा आरंभ आणि अंत होत नाही तर परमात्म्याशी नित्ययोगाचा अनुभव येतो.*

वास्तविक पाहिले असता परमात्म्याशी वियोग कधी झालाच नाही, होणेही संभव नाही. केवळ संसाराशी मानलेल्या संयोगामुळे परमात्म्याशी वियोग भासत आहे. संसाराशी मानलेल्या संयोगाचा त्याग केल्याबरोबर परमात्म-तत्त्वाची अभिलाषा असणाऱ्या मनुष्याला तात्काळ नित्ययोगाचा अनुभव येतो आणि त्यात स्थिती स्थिर होते.

अंत:करणाला शुद्ध करण्याची आवश्यकता देखील करणसापेक्ष प्रकारामध्येच आहे, करणनिरपेक्ष प्रकारामध्ये नाही. जसे पेन उत्कृष्ट असेल तर लिखाण उत्कृष्ट होऊ शकेल, पण लिहिणारा उत्कृष्ट होणार नाही. तसेच करण (अंत:करण) शुद्ध झाल्यास क्रिया तर शुद्ध होऊ शकतील पण कर्ता शुद्ध होणार नाही. अंत:करणाशी संबंध-विच्छेद झाल्यास कर्ता शुद्ध होतो कारण अंत:करणाशी आपला संबंध मानणे हीच मूळ अशुद्धी आहे.

नित्यप्राप्त परमात्मतत्त्वासोबत जीवाचा नित्ययोग स्वत: सिद्ध आहे म्हणून त्याच्या प्राप्तीसाठी करणाची अपेक्षा नाही. फक्त तिकडे दृष्टी ठेवायला हवी. ज्याप्रमाणे रामचरितमानसात वर्णन आढळते **''संकर सहज सरूपु सम्हारा''** (१-५८-४) अर्थात् भगवान् शंकरांनी आपल्या सहज स्वरूपाला सांभाळले, त्याकडे दृष्टी टाकली. जी वस्तू सुरवातीपासूनच आमच्या-जवळ असते तिलाच सांभाळले असे म्हणता येते आणि केवळ दृष्टी टाकण्याने तिच्या असण्याचा पत्ता लागतो. तसेच केवळ दृष्टी टाकण्याने नित्ययोगाचा अनुभव होतो. परंतु सांसारिक सुखाची कामना, आशा आणि भोगामुळे, तिकडे नजर टाकण्यास, त्याचा अनुभव घेण्यास कठीण वाटते. जोपर्यंत सांसारिक भोगाकडे आणि संग्रहाकडे दृष्टी आहे तोपर्यंत मनुष्य आपल्या स्वरूपाकडे दृष्टी टाकू शकेल असे त्याचे ठिकाणी सामर्थ्य नसते. जर एखाद्या कारणाने अथवा विशेष विवेचनाने तिकडे दृष्टी गेली तरी ती स्थिर होणे कठीण आहे. कारण नाशवान पदार्थाविषयींची जी प्रियता अंत:करणात ठसलेली आहे ती प्रियता भगवंताच्या स्वत:सिद्ध संबंधाला ओळखू देत नाही आणि ओळख झाली तर स्थिर राहू देत नाही. हां! जर अत्यंत तीव्र अभिलाषा जागृत झाली की, त्या तत्त्वाचा अनुभव कसा होईल? तर ही अभिलाषा संसाराची आसक्ती नष्ट करून टाकील असे तिच्यात सामर्थ्य असते.

गीतेमधील कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्ही साधने करणनिरपेक्ष अर्थात् स्व ने होणारी आहेत. कारण क्रिया आणि पदार्थ आपले आणि आपल्यासाठी नाहीत तर दुसऱ्यासाठी आणि दुसऱ्यांची सेवा करण्यासाठी आहेत. मी शरीर नाही आणि शरीर माझे नाही, मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत, अशा प्रकारे विवेकपूर्वक केला गेलेला विचार किंवा मान्यता करणसापेक्ष (अभ्यास) नाही. कारण यात जडाशी संबंध-विच्छेद आहे. म्हणून कर्मयोगामध्ये स्व जडतेचा त्याग करतो, ज्ञानयोगामध्ये स्व स्व ला जाणतो आणि भक्तियोगामध्ये स्व भगवंताला

* जोपर्यंत जडाशी संबंध असतो तोपर्यंत दोन अवस्था राहतात. कारण परिवर्तनशील असल्यामुळे जड प्रकृती कधीही एकरूप राहत नाही. म्हणून समाधी आणि व्युत्थान—ह्या दोन्ही अवस्था जडतेच्या संबंधानेच होतात. जडतेशी संबंध-विच्छेद झाल्यावर ''सहजावस्था'' होते ज्याला संतांनी ''सहज समाधी'' म्हटले आहे. यातून पुन: केव्हाही व्युत्थान होत नाही.

शरण होतो.

गीतेच्या ह्या ''साधक-संजीवनी'' टीकेमध्ये देखील करणनिरपेक्ष साधनेच्या पद्धतीलाच प्राधान्य दिले गेले आहे. कारण साधकांचे शीघ्रतेने आणि सुगमतापूर्वक कल्याण कसे होईल ही गोष्ट समोर ठेवूनच ही टीका लिहिली गेली आहे.

## —टीके विषयी—

लहानपणापासूनच माझी गीतेविषयी विशेष रुची आहे. गीतेचा गंभीरतापूर्वक मनन-विचार करण्याने तसेच अनेक संत महापुरुषांच्या संगतीने आणि वचनांनी मला गीतेचे विषय समजण्यात फार मदत झाली. गीतेमध्ये परम संतोषदायक अनन्त विचित्र-विचित्र भाव भरलेले आहेत. त्या भावांना पूर्ण रीतीने समजण्याचे आणि त्यांना व्यक्त करण्याचे सामर्थ्य माझ्यात नाही. परंतु जेव्हा काही गीताप्रेमी सज्जनांनी विशेष आग्रह केला, हट्ट केला, तेव्हा गीतेच्या मार्मिक भावांचा आपल्याला बोध होईल, तसेच आणखी कोणी मनन करील तर त्याला देखील याचा बोध होईल, या दृष्टीने गीतेची व्याख्या लिहून घेण्याची प्रवृत्ती झाली.

सर्वप्रथम एका बाराव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. याला संवत् २०३० मध्ये **''गीतेचा भक्तियोग''** नावाने प्रकाशित केले. यानंतर काही वर्षांनी तेराव्या आणि चौदाव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली जी संवत् २०३५ मध्ये **''गीतेचा ज्ञानयोग''** नावाने प्रकाशित केली. या लिखाणानंतर असा विचार झाला की, कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग हे तीन योग आहेत म्हणून या तिन्ही योगांवर तीन पुस्तके तयार झाली तर ठीक राहील, या दृष्टीने प्रथम बाराव्या अध्यायाच्या व्याख्येचे संशोधन वृद्धिंगत केले आणि त्या बरोबर पंधराव्या अध्यायाची व्याख्यासुद्धा एकत्रित करून संवत् २०३९ मध्ये **''गीतेचा भक्तियोग''** (द्वितीय संस्करण) नावाने प्रकाशित केली गेली. त्यानंतर तिसऱ्या, चौथ्या आणि पाचव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. याला **''गीतेचा कर्मयोग''** नावाने दोन खंडात प्रकाशित केले गेले. याचे प्रकाशन विलंबाने संवत् २०४० मध्ये झाले.

उपर्युक्त **''गीतेचा भक्तियोग'' ''गीतेचा ज्ञानयोग''** आणि **''गीतेचा कर्मयोग''** या तीन पुस्तकातील लिखाणाची शैली काही वेगळीच होती अर्थात् प्रथम संबंध, नंतर श्लोक, नंतर भावार्थ, नंतर अन्वय आणि नंतर पद-व्याख्या—अशी लेखनशैली होती परंतु ह्या तीन पुस्तकानंतर लिहिण्याची शैली बदलून टाकली. अर्थात् प्रथम संबंध, नंतर श्लोक, नंतर व्याख्या अशा प्रकारे लिहिले गेले. या लिखाणामागे इतरांची प्रेरणाही होती. लेखनशैली बदलण्याचा भाव हा होता की, लेखन विस्तार कमी व्हावा आणि लिखाण काम लवकर व्हावे ज्यामुळे वाचकांना वाचण्यास वेळ कमी लागावा आणि पुस्तकही लवकर छापले जाऊन लवकरात लवकर वाचकांच्या हाती देता यावे. ह्या शैलीने प्रथम सोळाव्या आणि सतराव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. ही संवत् २०३९ मध्ये **''गीतेमधील संपत्ती आणि श्रद्धा''** या नावाने प्रकाशित केली गेली. यानंतर गीतेच्या अठराव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. ही संवत् २०३९ मध्ये **''गीतेचा सार''** नावाने प्रकाशित केली गेली.

जेव्हा सोळाव्या, सतराव्या आणि अठराव्या अध्यायाच्या व्याख्या छापल्या गेल्या तेव्हा कुणीतरी सुचविले की जर श्लोकांचे अर्थही दिले तर ठीक होईल. कारण वाचक प्रथम श्लोकांचा अर्थ समजून घेईल आणि त्यामुळे व्याख्या समजणे सोपे जाईल. म्हणून **''गीतेमधील संपत्ती आणि श्रद्धा''** च्या दुसऱ्या आवृत्तीमध्ये (संवत् २०४०) श्लोकांचे अर्थही दिले गेले. श्लोकांचे अर्थ देण्याबरोबरच पदांची व्याख्या करण्याचा क्रमही थोडासा बदलला.

यानंतर दहाव्या आणि अकराव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. हिला **''गीतेमधील विभूती आणि विश्वरूप दर्शन''** या नावाने प्रकाशित केले गेले. त्यानंतर सातव्या, आठव्या आणि नवव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली, जिला **''गीतेची राजविद्या''** या नावाने प्रकाशित केले गेले. यानंतर सहाव्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. ती **''गीतेचा ध्यानयोग''** नावाने प्रकाशित केली. शेवटी पहिल्या आणि दुसऱ्या अध्यायाची व्याख्या लिहून घेतली. ती **''गीतेचा आरंभ''** नावाने प्रकाशित केली. ही चारही पुस्तके संवत् २०४१ मध्ये प्रकाशित झाली.

अशा प्रकारे भगवत्कृपेने गीतेवरील संपूर्ण टीका निरनिराळ्या दहा खंडातून गीताप्रेसकडून प्रकाशित झाली. यांना प्रकाशित करण्याच्या कार्यामध्ये कागद इत्यादींच्या अनेक अडचणी येत राहिल्या तरी पण सत्संगी बंधूंच्या प्रयत्नाने यांना प्रकाशित करण्याचे कार्य चालू राहिले. लोकांनी देखील या पुस्तकांचा उत्साहाने आणि प्रसन्नतेने स्वीकार केला ज्यामुळे बऱ्याच पुस्तकांच्या दोन-दोन, तीन-तीन आवृत्ती देखील निघाल्या.

ही टीका एका ठिकाणी बसून लिहून घेतली नाही तसेच पहिल्या अध्यायापासून अठराव्या अध्यायापर्यंत क्रमानेही लिहून घेतली नाही. म्हणून या टीकेमध्ये अगोदर-नंतरच्या दृष्टीने अनेक विरोध येऊ शकतात. परंतु यामुळे साधकांना कोठेही अडचण येणार नाही. कुठे-कुठे सिद्धांताच्या विवेचनातही फरक पडला आहे. परंतु कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—हे तीनही स्वतंत्रपणे परमात्मतत्त्वाची प्राप्ती करून दोणारे आहेत ह्यामध्ये काहीही फरक पडलेला नाही. टीका लिहविताना "साधकांना शीघ्र लाभ कसा होईल" हा भाव ठेवला आहे. या कारणाने टीकेची भाषा, शैली इत्यादी-मध्ये परिवर्तन होत राहिले.

ह्या टीकेत कित्येक श्लोकांचे विवेचन दुसऱ्या टीकांच्या विपरीत आढळते. परंतु याचे तात्पर्य दुसऱ्या टीकांना चूक दाखविण्याचा किंचिन्मात्र देखील भाव नाही. तर मला जसे निर्विवादरूपाने उचित, प्रकरण-सङ्गत, युक्ति-युक्त, संतोषजनक आणि प्रिय वाटले तसेच विवेचन मी केले आहे. माझा भाव कोणाचे खंडन किंवा कोणाचे मंडन करण्याचा मुळीच नाही.

श्रीमद्भगवद्गीतेचा अर्थ फारच सखोल आहे. याचे पठन-पाठन, मनन-चिंतन आणि विचार केल्यास अत्यंत विलक्षण आणि नवीन नवीन भाव स्फुरण पावतात, ज्यामुळे मन बुद्धी चकित होऊन तृप्त होतात. टीका लिहवितेवेळी जेव्हा या भावांना लिहविण्याचा विचार येतो तेव्हा असा एक विचित्र पूर येतो की कोण कोणते भाव लिहून घेऊ? आणि कसे लिहून घेऊ? या विषयात मी स्वत: ला अगदी असमर्थ मानतो. तरी पण माझे जे सहकारी आहेत, आदरणीय मित्र आहेत त्यांच्या आग्रहास्तव काहीतरी लिहून घेतो. ते त्या भावांना लिहून घेतात आणि संशोधन करून त्यांना पुस्तक-रूपाने प्रकाशित करतात. पुन: जेव्हा त्या पुस्तकांना पाहण्याचा प्रसंग येतो तेव्हा त्यात पुष्कळ ठिकाणी उणीवा दिसतात आणि असे वाटते की, पूर्ण विषय आला नाही, पुष्कळशा गोष्टी सुटल्या आहेत. म्हणून त्यात पुन: पुन: संशोधन-परिवर्धन करण्यात आले. सारांश, पाठकांना प्रार्थना आहे की, त्यांनी सुरवातीला लिहिल्या गेलेल्या विषयापेक्षा नंतर लिहिलेल्या विषयांना महत्त्व देऊन त्यांचा स्वीकार करावा.

पूर्ण गीतेच्या टीकेचे वेगवेगळे अनेक खंड असल्याने त्यांच्या पुनर्मुद्रणात आणि ते सर्व एकाच वेळी प्राप्त होणे कठीण जाते—अशा विचाराने आता पूर्ण गीतेच्या टीकेला एका वेष्टनात प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने प्रकाशित करण्यात आले. हे करण्यापूर्वी प्रथम पूर्व-प्रकाशित संपूर्ण टीकेला एक वेळ पुन: पाहिले आणि त्यात आवश्यक संशोधन, परिवर्तन आणि परिवर्धन देखील केले. तेराव्या आणि चौदाव्या अध्यायाची व्याख्या देखील पुन्हा लिहून घेतली. भाषा आणि शैलीला देखील जवळ जवळ एकसमान करण्याचा प्रयत्न केला. पुष्कळ गोष्टींना अनावश्यक समजून वगळून टाकले, पुष्कळ नवीन गोष्टींचा अंतर्भाव करण्यात आला आणि पुष्कळ विवेचन एका ठिकाणाहून काढून दुसऱ्या योग्य ठिकाणी जोडले आहे. ज्या विषयाची अधिक पुनरावृत्ती झाली आहे त्याला शक्य झाल्याप्रमाणे वगळण्यात आले आहे परंतु सर्वथैव नाही. साधकांसाठी उपयोगी समजून विशेष ध्यान देण्यायोग्य गोष्टींच्या पुनरावृत्तीला कमी केले नाही. या कार्यात अनेक चुका देखील होऊ शकतात त्यासाठी माझी पाठकांना हात जोडून क्षमा याचना आहे. त्याचबरोबर पाठकांना ही प्रार्थना आहे की, त्यांना ज्या चुका दिसतील त्या त्यांनी सूचित करण्याची कृपा करावी ज्यामुळे पुढील आवृत्तीमध्ये त्यांची दुरुस्ती करणे सुलभ होईल.

गीतेच्या अनुषंगाने पुष्कळ नवीन विषयांचा, संशोधनपूर्ण निबंधाचा एक संग्रह वेगळ्या रीतीने केला आहे, ज्याला "गीता दर्पण" या नावाने प्रकाशित केले गेले आहे.

गीतेचे मनन-विचार केल्यामुळे आणि गीतेवर टीका लिहून घेतल्यामुळे मला अत्यंत अध्यात्मिक लाभ झाला आहे आणि गीतेच्या विषयाचा अत्यंत स्पष्ट बोध देखील झाला आहे. दूसरे बंधू-भगिनी देखील जर याचे मनन करतील तर त्यांना देखील अध्यात्मिक लाभ अवश्य होईल—अशी माझी व्यक्तिगत धारणा आहे. गीतेचे मनन-विचार करण्याने लाभ होतो—यात मला कधीही किंचिन्मात्र देखील सन्देह नाही.

***कृष्णानुग्रहदायिका सकरुणा गीता समाराधिता***  
***कर्मज्ञानविरागभक्तिरसिका मर्मार्थसंदर्शिका।***  
***सोत्कण्ठं किल साधकैरनुदिनं पेपीयमाना सदा***  
***कल्याणं परदेवतेव दिशती संजीवनी वर्धताम्॥****

विनीत—

**स्वामी रामसुखदास**

* 'कर्म, ज्ञान, वैराग्य आणि भक्तिरसाने परिपूर्ण या करुणामय गीतेची उत्तमप्रकारे उपासना केली (मनन केले गेले, अर्थ खोलवर समजून घेतला) तर ही भगवान् श्रीकृष्णाची कृपा प्रदान करणारी आहे. साधकांद्वारा उत्कंठापूर्वक सदा वारंवार पठन केली जाणारी, गीतेच्या पदांचा मार्मिक अर्थ दर्शविणारी आणि इष्ट देवासारखे कल्याण प्रदान करणारी ही 'साधक-संजीवनी' निरंतर वृद्धीला प्राप्त होवो.'



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥

# श्रीमद्भगवद्गीता

## (साधक-संजीवनी मराठी-टीकासहित)

गजाननं भूतगणादिसेवितं कपित्थजम्बूफलचारुभक्षणम्।
उमासुतं शोकविनाशकारकं नमामि विघ्नेश्वरपादपङ्कजम्॥*

ध्यानाभ्यासवशीकृतेन मनसा तन्निर्गुणं निष्क्रियं
ज्योतिः किञ्चन योगिनो यदि परं पश्यन्ति पश्यन्तु ते।
अस्माकं तु तदेव लोचनचमत्काराय भूयाच्चिरं
कालिन्दीपुलिनोदरे किमपि यन्नीलं महो धावति॥†

यावन्निरञ्जनमजं पुरुषं जरन्तं
संचिन्तयामि निखिले जगति स्फुरन्तम्।
तावद् बलात् स्फुरति हन्त हृदन्तरे मे
गोपस्य कोऽपि शिशुरञ्जनपुञ्जमञ्जुः॥‡

---

* जे हत्तीचे मुख असणारे आहेत, भूतगणादि द्वारा सेवित आहेत. कऊठ आणि जांभूळ या फळांना मोठ्या सुंदर रीतीने भक्षण करणारे आहेत, शोकविनाश करणारे आहेत आणि भगवती पार्वतीचे पुत्र आहेत, अशा त्या गणेशजींच्या चरणकमलांना मी प्रणाम करतो.

† योगीलोक ध्यानाद्वारा वशीभूत झालेल्या मनाने कोण्या निर्गुण आणि निष्क्रिय परम ज्योतीला पाहतात तर पाहोत परंतु आम्हासाठी तर यमूनेच्या तीरावर जे कोणी निळे तेज धावते, तेच नेत्रात चिरकाळापर्यंत प्रकाश दीप्ती उत्पन्न करीत राहो.

‡ अहो! जेव्हा मी संपूर्ण जगात स्फूरित होणाऱ्या निरंजन, अजन्मा आणि पुरातन पुरुषाचे चिंतन करतो, तेव्हा माझ्या हृदयात काजळ समूहाप्रमाणे काळ्या वर्णाचा कोणी गोप जबरीने स्फूरित होऊ लागतो.

न विद्या येषां श्रीर्न शरणमपीषन्न च गुणाः
परित्यक्ता लोकैरपि वृजिनयुक्ताः श्रुतिजडाः।
शरण्यं यं तेऽपि प्रसृतगुणमाश्रित्य सुजना
विमुक्तास्तं वन्दे यदुपतिमहं कृष्णममलम्॥*

यस्य करुणार्णवस्य करुणालेशेन बालो ध्रुवः
स्वेष्टं प्राप्य समार्यधाम समगाद्रङ्कोऽप्यविन्दच्छ्रियम्।
याता मुक्तिमजामिलादिपतिताः शैलोऽपि पूज्योऽभवत्
तं श्रीमाधवमाश्रितेष्टदमदं नित्यं शरण्यं भजे॥†

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम्।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम्॥‡

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत्॥$

---

* ज्यांच्याजवळ विद्याही नाही, धनही नाही, कोणाचा आश्रयही नाही, ज्यांच्यात गुणही नाहीत, वेदशास्त्रांचे ज्ञानही नाही, ज्यांचा संसारी लोकांनी पापी समजून त्याग केला आहे, अशी माणसे सुद्धा ज्या शरणागतपालक प्रभूंची शरणागती घेऊन संत होतात आणि मुक्त होतात, त्या विश्वविख्यात गुणांनीयुक्त अमलात्मा (निर्मळ) यदुनाथ भगवान् श्रीकृष्णांना मी प्रणाम करतो.

† ज्या करुणासिंधू भगवंताच्या करुणेच्या एका अंशाने बालक ध्रुवाने आपल्या इष्ट वस्तूला प्राप्त करून श्रेष्ठ पुरुषांच्या लोकाला प्राप्त केले, दरिद्री सुदाम्याने लक्ष्मीला प्राप्त केले, अजामिळ इत्यादी पाप्यांनी मुक्तीला प्राप्त केले आणि गोवर्धनपर्वतसुद्धा पूज्य बनला, त्या शरणागत भक्तांना इच्छित वस्तू देणाऱ्या शरण्य भगवान् माधवाचे मी नित्य भजन करतो.

‡ जे वसुदेवांचे पुत्र, दिव्यरूपधारी, कंस आणि चाणूराचा नाश करणारे आणि देवकीसाठी परम आनंद स्वरूप आहेत, त्या जगद्गुरू भगवान् श्रीकृष्णांची मी वंदना करतो.

$ भगवान् श्रीकृष्ण आणि मानवात श्रेष्ठ असणाऱ्या अर्जुनांना व सरस्वती आणि वेदव्यासजींना नमस्कार करून मग महाभारताचे कथन केले पाहिजे.



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ प्रथमोऽध्यायः

## पूर्व पीठिका

*पांडवांनी बारा वर्षांचा वनवास व एक वर्षाचा अज्ञातवास संपवून जेव्हा प्रतिज्ञेप्रमाणे आपले अर्धे राज्य मागितले, तेव्हा अर्धे राज्य तर सोडून द्या, दुर्योधनाने तीक्ष्ण सुईच्या अग्रावर मावेल इतकी जमीनसुद्धा युद्धावाचून देण्याचे मान्य केले नाही. म्हणून पाण्डवांनी माता कुंतीच्या आज्ञेप्रमाणे युद्ध करण्याचे ठरविले. अशा प्रकारे पांडव आणि कौरवांचे युद्ध होणे निश्चित झाले आणि त्याप्रमाणे दोन्हीकडे युद्धाची तयारी सुरू झाली.*

*महर्षि वेदव्यासांचे धृतराष्ट्रावर फार प्रेम होते. त्या प्रेमामुळे त्यांनी धृतराष्ट्राजवळ येऊन म्हटले की, युद्ध होणे आणि त्यात क्षत्रियांचा भीषण संहार होणे अवश्यंभावी आहे. याला कोणीही टाळू शकत नाही. जर तुम्हाला युद्ध पाहण्याची इच्छा असेल तर मी तुम्हाला दिव्य दृष्टी देऊ शकतो. ज्यामुळे तुम्ही येथेच बसल्या ठिकाणी युद्ध चांगल्या रीतीने पाहू शकता. यावर धृतराष्ट्र म्हणाले की, मी जन्मभर आंधळा राहिलो आता आपल्या कुलाचा संहार पाहू इच्छित नाही परंतु युद्ध कसे होत आहे याचा समाचार मात्र जरूर ऐकू इच्छितो. तेव्हा व्यासजी म्हणाले की, मी संजयाला दिव्य दृष्टी देतो त्यामुळे संजय संपूर्ण युद्धाला, संपूर्ण घटनांना, सैनिकांच्या मनात आलेल्या विचारांना सुद्धा जाणेल, ऐकेल, पाहील आणि सर्व समाचार तुम्हाला सांगेल. असे म्हणून व्यासांनी संजयाला दिव्य दृष्टी प्रदान केली.*

*निश्चित समयानुसार कुरुक्षेत्राच्या ठिकाणी युद्ध प्रारंभ झाले. दहा दिवस संजय युद्ध स्थलातच होते. जेव्हा भीष्मपितामह बाणांच्या माऱ्यांनी रथाच्या खाली पाडले गेले तेव्हा संजयाने हस्तिनापुराला जाऊन (जेथे धृतराष्ट्र राहत होते) धृतराष्ट्राला हा समाचार सांगितला. हा समाचार ऐकून धृतराष्ट्राला अत्यंत दुःख झाले आणि ते शोक करू लागले. नंतर त्यांनी संजयाला युद्धाचे संपूर्ण वर्तमान ऐकविण्याविषयी म्हटले "भीष्मपर्वाच्या चोवीसाव्या" अध्यायापर्यंत संजयाने युद्धाविषयीचे सर्व वर्तमान धृतराष्ट्राला सांगितले.**

*पंचवीसाव्या अध्यायाच्या सुरुवातीला धृतराष्ट्र संजयाला विचारतात—*

*धृतराष्ट्र उवाच*

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय॥ १ ॥**

धृतराष्ट्र म्हणाले—†

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सञ्जय** | = हे संजय!‡ | **युयुत्सवः** | = युद्धाचे इच्छुक | **पाण्डवाः** | = पांडूच्या पुत्रांनी |
| **धर्मक्षेत्रे** | = धर्मभूमी | | | **एव** | = ही |
| **कुरुक्षेत्रे** | = कुरुक्षेत्रात | **मामकाः** | = माझ्या | **किम्** | = काय |
| **समवेताः** | = एकत्र झालेले | **च** | = आणि | **अकुर्वत** | = केले? |

---

* महाभारतात एकूण १८ पर्व आहेत. या पर्वांच्या अंतर्गत अनेक अवांतर पर्वही आहेत. त्यापैकी (भीष्मपर्वांतर्गत) हे "श्रीमद्भगवद्गीतापर्व" आहे जे भीष्मपर्वाच्या तेराव्या अध्यायापासून आरंभ होऊन बेचाळीसाव्या अध्यायामध्ये समाप्त होते.

† वैशंपायन आणि जनमेजय यांच्या संवादांतर्गत "धृतराष्ट्र संजय संवाद" आहे आणि धृतराष्ट्र तसेच संजयाच्या संवादांतर्गत "श्रीकृष्णार्जुन संवाद" आहे

‡ संजयाचा जन्म गवल्गण नावाच्या सूतापासून झाला होता. हे मुनिप्रमाणे ज्ञानी आणि धर्मात्मा होते. "संजयो मुनिकल्पस्तु जज्ञे सूतो गवल्गणात्" (महाभारत, आदि. ६३। ९७). हे धृतराष्ट्राचे मंत्री होते.

*व्याख्या* ( स्पष्टीकरण )—**''धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे''**— कुरुक्षेत्रांत देवतांनी यज्ञ केला होता. कुरुराजानेही येथे तपश्चर्या केली होती. यज्ञादी धर्ममय कर्मे झाल्याने आणि कुरू राजाची तपोभूमी असल्याने या ठिकाणाला धर्मभूमी कुरुक्षेत्र म्हटले गेले आहे.

याठिकाणी **''धर्मक्षेत्रे** आणि **कुरुक्षेत्रे''** पदांत **''क्षेत्र''** शब्द देण्यात धृतराष्ट्राचा अभिप्राय असा आहे की, ही आपली कुरुवंशीयांची भूमी आहे. ही केवळ युद्धभूमीच नाही तर तीर्थभूमीही आहे. या ठिकाणी मनुष्य जिवंतपणी पवित्र कर्मे करून आपले कल्याण करून घेऊ शकतो. असा विचार करून तसेच श्रेष्ठ पुरुषांची सम्मती घेऊनच लौकिक आणि पारलौकिक लाभ व्हावा या दृष्टीने ही भूमी युद्धासाठी निश्चित केली गेली.

संसारात प्रामुख्याने ''भूमी, धन आणि स्त्री'' या तीन वस्तूसाठीच लढाया होतात. या तीनपैकी राजेलोक मुख्यत: भूमीसाठी आपसात लढतात. येथे **''कुरुक्षेत्रे''** पद देण्याचे तात्पर्य सुद्धा जमीनीला धरूनच आहे. कुरुवंश म्हटला की, धृतराष्ट्र आणि पांडूचे पुत्र त्यात येतातच. दोन्हीही कुरुवंशीय असल्याने कुरू राजाच्या भूमीवर अर्थात् कुरुक्षेत्रावर दोघांचाही समान हक्क होतो. म्हणून (कौरवांनी पांडवांना भूमी न दिल्यामुळे) दोघेही जमीनीकरीता युद्धासाठी आले आहेत.

जरी आपली भूमी असल्यामुळे दोघांसाठी ''कुरुक्षेत्रे'' हे पद योजणे युक्तिसंगत आणि न्यायसंगत असले तरीही आमची सनातन वैदिक संस्कृती अशी विलक्षण आहे की, कोणतेही कार्य करावयाचे असेल तर ते धर्माला अनुसरूनच केले जाते. युद्धात मरणाऱ्यांचा उद्धार व्हावा, कल्याण व्हावे. म्हणून युद्धासारखे भयंकर कार्य सुद्धा धर्मभूमीमध्ये, तीर्थभूमी-मध्ये केले जाते. म्हणून या ठिकाणी कुरुक्षेत्राबरोबर ''धर्मक्षेत्रे'' पद आलेले आहे.

येथे सुरुवातीला **''धर्म''** पदाने आणखी एक गोष्ट ज्ञात होते. जर सुरुवातीच्या **''धर्म''** पदातील **''धर्''** ही अक्षरे घेतली आणि अठराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकामधील **''मम''** या पदातील **'म'** हे अक्षर घेतले तर **'धर्म'** शब्द तयार होतो. म्हणून संपूर्ण गीता धर्माच्या अंतर्गत येते अर्थात् धर्माचे पालन झाल्यास गीतेच्या सिद्धांताचे पालन होते आणि गीतेच्या सिद्धांतानुसार कर्तव्यकर्म करण्याने धर्माचे अनुष्ठान होते.

या **''धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे''** पदातून सर्वांनी हाच बोध घेतला पाहिजे की, कोणतेही कर्म धर्माला अनुसरूनच करावे. प्रत्येक कार्य सर्वांच्या हिताच्या दृष्टीनेच केले पाहिजे. केवळ आपल्या सुख आरामाच्या दृष्टीने नव्हे आणि कर्तव्य-अकर्तव्य याविषयी शास्त्राचा विचार समोर ठेवला पाहिजे (गीता १६।२४)

**''समवेता युयुत्सवः''**—अनेक राजांनी वेळोवेळी समजावून आणि संधि (तडजोड) करण्याचा प्रस्ताव ठेवूनही दुर्योधन तडजोड करण्याला मुळीच तयार झाला नाही. एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णाने सांगूनही माझ्या दुर्योधनाने स्पष्ट म्हटले की, युद्धावाचून मी पांडवांना तीक्ष्ण सुईच्या अग्रावर मावेल इतकीही जमीन देणार नाही.* म्हणून नाईलाजाने पांडवसुद्धा युद्ध करण्यास तयार झाले. अशा प्रकारे माझे पुत्र आणि पांडूचे पुत्र हे दोन्हीही सैन्यासमवेत युद्धाच्या इच्छेने एकत्र झाले आहेत.

दोन्ही सैन्यांना युद्धाची इच्छा होती परंतु दुर्योधनाच्या मनात युद्धाची इच्छा विशेष बलवत्तर होती. त्याचा मुख्य उद्देश राज्यप्राप्तीचाच होता. मग ती राज्यप्राप्ती धर्माने होवो अथवा अधर्माने होवो, न्यायाने अथवा अन्यायाने, विहित पद्धतीने अथवा निषिद्ध पद्धतीने. कोणत्याही प्रकारे का होईना राज्य मिळाले पाहिजे असा त्याचा भाव होता. म्हणूनच दुर्योधनाचा पक्षच विशेषरूपाने युयुत्सु अर्थात् युद्धाची इच्छा असलेला होता.

पांडवांची धर्मावर निष्ठा होती. कोणत्याही प्रकाराने जीवननिर्वाह करू. पण धर्माविरुद्ध आचरण करणार नाही आणि धर्मात बाधा होऊ देणार नाही. याच भावनेने युधिष्ठिर महाराज युद्ध करू इच्छित नव्हते. परंतु ज्या माता कुंतीच्या आज्ञेने त्यांनी आपल्या चारही बंधूसह द्रौपदीशी विवाह केला होता त्या मातेच्या आज्ञेनेच धर्मराज युद्धाला प्रवृत्त झाले आहेत.† अर्थात् केवळ आईची आज्ञा पालन करणे हाच धर्म

* यावद्धि तीक्ष्णया सूच्या विध्येदग्रेण केशव। तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पाण्डवान् प्रति ॥

(महाभारत उद्योग १२७।२५)

† माता कुन्ती फारच सहनशील वृत्तीची होती. कष्ट टाकून सुख, आराम, राज्य इत्यादींची इच्छा त्यांच्या मनात नव्हती. तीच एक अशी विलक्षण माता होती की, जिने भगवंताकडून विपत्तीचेच वरदान मागितले होते. तिच्यात सुखलोलुपता नव्हती. परंतु तिच्या मनात दोन गोष्टीविषयी फार दु:ख होते. पहिली गोष्ट—राज्यासाठी कौरव-पांडव आपसात का लढेनात, काही का करेनात पण माझ्या आवडत्या पुत्रवधू द्रौपदीला या दुर्योधनादी दुष्टांनी सभेमध्ये नग्न करण्याचा प्रयत्न केला. अपमानित केले. असा घृणास्पद प्रयत्न करणे मानवता नव्हे. ह्या गोष्टीने माता कुंतीला अत्यंत वाईट वाटले. दुसरी गोष्ट—भगवान् श्रीकृष्ण पांडवांकडून संधीचा प्रस्ताव घेवून हस्तिनापूरला आले त्यावेळी दुर्योधन, दु:-

समजून धर्मराज युद्धाला तयार झाले आहेत. तात्पर्य दुर्योधनादी तर राज्याच्या इच्छेने युद्धाला तयार झाले होते परंतु पांडव "धर्मपालन" करण्यासाठी युद्धाला तयार झाले होते.

"**मामकाः पाण्डवाश्चैव**"—पांडव धृतराष्ट्राला (आपल्या वडिलांचे जेष्ठ बंधू असल्यामुळे) वडिलांप्रमाणे मानत होते आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करीत होते. धृतराष्ट्राने अनुचित आज्ञा दिली तरी पांडव उचित-अनुचिताचा विचार न करता त्यांची आज्ञा पाळत होते. म्हणून येथे "**मामकाः**" पदाच्या अंतर्गत कौरव* आणि पांडव हे दोन्हीही येतात. तरीही "**पाण्डवाः**" वेगळे पद देण्याचे तात्पर्य धृतराष्ट्राचा आपल्या पुत्रांत आणि पांडुपुत्रांत समभाव नव्हता. ते पक्षपात करीत असत. त्यांना आपल्या पुत्रांविषयी मोह होता. ते दुर्योधनादिकांना तर आपले मानत असत पण पांडवांना आपले समजत नसत.† म्हणून त्यांनी आपल्या पुत्रांसाठी "**मामकाः**" आणि पांडूपुत्रांसाठी "**पाण्डवाः**" पदाचा प्रयोग केला आहे. कारण जे भाव अंत:करणात असतात तेच सहसा वाणीतून बाहेर प्रगट होतात. या आपपरभाव-वृत्तीमुळेच धृतराष्ट्राला आपल्या कुलाच्या संहाराचे दुःख भोगावे लागले. यापासून प्रत्येक मनुष्याने असा बोध घ्यावा की, त्याने आपल्या घरात, गल्लीत, गावात, प्रांतात, देशात, सांप्रदायात आपपरभाव (द्वैतभाव) अर्थात् हे आपले आहेत आणि ते दुसरे आहेत असा भाव ठेवू नये. कारण द्वैत भावनेनेच आपसात प्रेम, स्नेह राहत नाही तर कलह निर्माण होतात.

येथे "**पाण्डवाः**" पदाबरोबर "**एव**" पद देण्याचे तात्पर्य असे आहे की, पांडव तर फार धर्मात्मा आहेत म्हणून त्यांनी युद्ध करावयास नको होते परंतु तेही युद्धासाठी रणभूमीत उतरले तर मग त्यांनी तेथे येऊन काय केले?

[**मामकाः** आणि **पाण्डवाः**‡ यांपैकी पहिल्या पदाचे उत्तर संजय दुसऱ्या श्लोकापासून तेराव्या श्लोकापर्यंत देतील. ते असे की, आपला पुत्र दुर्योधनाने पांडवांचे सैन्य पाहून द्रोणाचार्यांच्या मनात पांडवांविषयी द्वेष निर्माण होण्यासाठी द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांना पांडवांच्या प्रमुख-प्रमुख सेनापतींची नावे सांगितली. त्यानंतर दुर्योधनाने आपल्याकडील प्रमुख-प्रमुख सेनापतींची नावे सांगून त्यांच्या युद्धकलेमधील नैपुण्याची प्रशंसा केली. दुर्योधनाला खुश (प्रसन्न) करण्यासाठी भीष्माचार्यांनी दीर्घस्वरांत आपला शंख वाजविला. ते ऐकून कौरव सैन्याने शंख व इतर रणवाद्ये वाजविली. त्यानंतर चौदाव्या श्लोकापासून एकोणविसाव्या श्लोकापर्यंत "**पाण्डवाः**" या पदाचे उत्तर देतील की, रथामध्ये बसलेल्या पांडवांच्या पक्षाकडील भगवान् श्रीकृष्णांनी आपला शंख वाजविला. त्यानंतर अर्जुन, भीम, युधिष्ठिर, नकुल, सहदेव इत्यादींनी आपापले शंख वाजविले. ज्याच्या नादाने (ध्वनीने) दुर्योधनाच्या सैन्याची हृदये विदीर्ण झाली. त्यानंतर पांडवांची हकीकत सांगत सांगत विसाव्या श्लोकापासून संजय श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्यामध्ये झालेल्या संवादाचा प्रसंग वर्णन करतील]

"**किमकुर्वत**"—"**किम्**" या शब्दाचे तीन अर्थ होतात. विकल्प, निन्दा (आक्षेप) आणि प्रश्न. युद्ध झाले किंवा नाही असा विकल्प तर येथे घेतला जाऊ शकत नाही. कारण युद्ध सुरू होऊन दहा दिवस झाले आहेत आणि भीष्माचार्यांना रथावरून खाली पाडल्यानंतर संजय हस्तिनापुरी येऊन धृतराष्ट्राला तेथील (कुरुक्षेत्रावरील) घटना सांगत आहेत.

माझ्या आणि पांडूच्या पुत्रांनी हे काय केले! की ज्यामुळे ते युद्ध करू लागले. "त्यांनी युद्ध करावयास नको होते" अशी निंदा अथवा आक्षेप सुद्धा येथे घेतला जाऊ शकत नाही. कारण युद्ध तर चालूच होते आणि धृतराष्ट्राच्या मनातसुद्धा आक्षेपपूर्वक विचारण्याची भावना नव्हती.

---

शासन, कर्ण, शकुनी इत्यादींनी भगवंताला पकडून कैद करण्याचा प्रयत्न केला. ही गोष्ट ऐकून कुंतीला हा विचार आला की, आता या दुष्टांना लवकरच नष्ट केले पाहिजे. कारण यांच्या जिवंत राहण्याने यांचे पाप वाढतच जाईल. त्यामुळे यांचे फार नुकसान होईल. याच दोन कारणांनी माता कुंतीने पांडवांना युद्धासाठी आज्ञा दिली होती.

* जरी 'कौरव' शब्दाच्या अंतर्गत धृतराष्ट्राचे पुत्र दुर्योधन इत्यादी आणि पांडूचे पुत्र युधिष्ठिर इत्यादी सर्व येतात तरीपण या श्लोकात धृतराष्ट्राने युधिष्ठिर इत्यादींसाठी "पांडव" शब्दाचा प्रयोग केला आहे म्हणून व्याख्येत "कौरव" शब्द दुर्योधन इत्यादींसाठीच दिला गेला आहे.

† धृतराष्ट्राच्या मनामध्ये आपपरभाव होता की, दुर्योधन इत्यादी माझे पुत्र आहेत आणि युधिष्ठिर इत्यादी माझे पुत्र नाहीत तर पांडूचे पुत्र आहेत. या भावनेनेच दुर्योधनाचे भीमाला विष पाजून नदीमध्ये फेकून देणे, लाक्षागृहात पांडवांना जाळण्याचा प्रयत्न करणे, युधिष्ठिराबरोबर कपटनीतीने द्यूत खेळणे, पांडवांना ठार करण्याच्या उद्देशाने सैन्य घेऊन वनात जाणे इत्यादी कार्य करण्यात दुर्योधनाला धृतराष्ट्राने कधीही मनाई केली नाही. कारण त्यांच्या अंत:करणात हाच भाव होता की, जर कोणत्याही प्रकाराने का होईना पांडव नष्ट झाले तर माझ्या मुलाचे राज्य सुरक्षित राहील.

‡ येथे आलेल्या "मामकाः" आणि "पाण्डवाः" चे वेगवेगळे वर्णन करण्याच्या दृष्टीनेच पुढे संजयाच्या वचनात "दुर्योधनः" (१।२) आणि "पाण्डवः" (१।१४) शब्द आले आहेत.

येथे ''**किम्**'' शब्दाचा अर्थ प्रश्न असाच घेणे योग्य वाटते. धृतराष्ट्र संजयापासून निरनिराळ्या प्रकारच्या लहान मोठ्या घटना क्रमवार, विस्तारपूर्वक आणि योग्य प्रकारे जाणून घेण्यासाठीच प्रश्न करीत आहेत.

**परिशिष्ट भाव**—'माझे पुत्र' ( **मामकाः** ) आणि 'पांडूचे' ( **पाण्डवाः** ) या मतभेदानेच राग-द्वेष उत्पन्न झाले. त्यामुळे युद्ध झाले, चलबिचल झाली. धृतराष्ट्र यांच्या अंत:करणात उत्पन्न झालेल्या राग-द्वेषाचे फळ हे झाले की, शंभरचे शंभर कौरव मारले गेले, परंतु पांडव एकसुद्धा मारला गेला नाही!

जसे दही घुसळतात तर त्यात चलबिचल निर्माण होते, त्यामुळे लोणी निघते, तसेच '**मामकाः**' आणि '**पाण्डवाः**' अशा भेदाने निर्माण झालेल्या चलबिचलने अर्जुनाच्या मनात कल्याणाची अभिलाषा जागृत झाली, त्यामुळे भगवद्गीतारूपी लोणी निघाले!

तात्पर्य हे झाले की, धृतराष्ट्राच्या मनात झालेल्या चलबिचलने युद्ध निर्माण झाले आणि अर्जुनाच्या मनात झालेल्या चलबिचलने गीता प्रकट झाली!

***संबंध***—*धृतराष्ट्राच्या प्रश्नाला उत्तर देण्यास संजय पुढील (नंतरच्या) श्लोकापासून सुरुवात करतात.*

*सञ्जय उवाच*

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा।**
**आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत्॥ २॥**

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तदा** | = त्यावेळी | **दृष्ट्वा** | = पाहून | **राजा** | = राजा |
| **व्यूढम्** | = वज्रव्यूहात्मक उभ्या असलेल्या | **तु** | = आणि | **दुर्योधनः** | = दुर्योधन (हे) |
| **पाण्डवानीकम्** | = पांडव सेनेला | **आचार्यम्** | = द्रोणाचार्यांजवळ | **वचनम्** | = वचन |
| | | **उपसङ्गम्य** | = जाऊन | **अब्रवीत्** | = म्हणाला. |

*व्याख्या*—'**तदा**'—ज्यावेळी दोन्ही पक्षांकडील सैन्य युद्धासाठी उभे राहिले होते. त्यावेळची घटना संजय येथे ''**तदा**'' या पदाने सांगतात. कारण धृतराष्ट्राचा प्रश्न ''युद्धाची इच्छा असणाऱ्या माझ्या आणि पांडूच्या पुत्रांनी काय केले'' हा विषय ऐकण्यासाठीच आहे.

''**दृष्ट्वा*पाण्डवानीकंव्यूढम्**''—पांडवांची व्यूहरचनात्मक उभी असलेली सेना पाहण्याचे तात्पर्य हे आहे की, पांडवांची सेना अत्यंत उत्तम रीतीने आणि ऐक्यभावाने उभी होती. अर्थात् त्यांच्या सैन्यात दोन भाव नव्हते. मतभेद नव्हते† त्यांच्या पक्षात धर्म आणि श्रीकृष्ण भगवान् होते. ज्यांच्या पक्षात धर्म आणि भगवान् श्रीकृष्ण असतात त्यांचा दूसऱ्यांवर फार प्रभाव पडतो. म्हणूनच संख्येने कमी असूनही पांडवांच्या सैन्यात तेज (प्रभाव) होते आणि त्याचा दुसऱ्यांवर फार मोठा प्रभाव पडत होता. म्हणून पांडव सेनेचा दुर्योधनावरही फार मोठा प्रभाव पडला की, ज्यामुळे तो द्रोणाचार्यांजवळ जाऊन नीतियुक्त अशी गंभीर वचने बोलतो.

''**राजा दुर्योधनः**''—दुर्योधनाला राजा म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, धृतराष्ट्राचा सर्वात जास्त (विशेष) दुर्योधनाशी आपलेपणा (मोह) होता. परंपरेच्या दृष्टीने सुद्धा दुर्योधनच युवराज होता. राज्यकारभार दुर्योधनच पाहत होता. धृतराष्ट्र तर ''नाममात्र'' राजे होते. युद्ध होण्यात सुद्धा मुख्य कारण दुर्योधनच होता. या सर्व कारणांनी दुर्योधनाला संजयाने ''राजा'' असे संबोधन दिले आहे.

''**आचार्यमुपसङ्गम्य**''—द्रोणाचार्यांजवळ जाण्यामागे प्रामुख्याने तीन कारणे असावीत—(१) आपला स्वार्थ साधण्यासाठी अर्थात् द्रोणाचार्यांच्या मनात पांडवाविषयी द्वेष-

* या अध्यायात तीन वेळा ''दृष्ट्वा'' (पाहून) पदाचा प्रयोग झाला आहे—पाण्डव सेनेला पाहून दुर्योधनाचे द्रोणाचार्यांजवळ जाणे (१।२), कौरवसेनेला पाहून अर्जुनाचे धनुष्य उचलणे (१।२०) आणि आपल्या स्वजनांना (कुटुंबियांना) पाहून अर्जुनाचे मोहाविष्ट होणे (१।२८) या तिन्हीपैकी दोन ''दृष्ट्वा'' तर एकमेकाचे सैन्य पाहण्यासाठी वापरले आहे आणि एक ''दृष्ट्वा'' स्वजनांना पाहण्यासाठी आले आहे, ज्यामुळे अर्जुनाचा भाव बदलून जातो.

† कौरवसैन्यात मतभेद होता. कारण दुर्योधन, दु:शासन इत्यादी युद्ध करणे इच्छित होते. परंतु भीष्माचार्य, द्रोणाचार्य, विकर्ण इत्यादी युद्ध करू इच्छित नव्हते. हा नियम आहे की, ज्या ठिकाणी आपसात मतभेद असतो त्या ठिकाणी तेज (प्रभाव) राहत नाही.
काँच कटोरो कुम्भ पय मोती मिन्त अवास। ताल घाव तिरिया कटक फाटा करे बिनास॥

भावना निर्माण करून त्यांनी आपल्या पक्षात विशेषतेने कार्य करावे. यासाठी दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ गेला. (२) व्यावहारिक दृष्ट्या "गुरू" या नात्याने त्यांना मानवंदना, (आदर) देण्यासाठी सुद्धा दुर्योधनाचे द्रोणाचार्यांजवळ जाणे योग्य होते. (३) युद्धामध्ये प्रमुख व्यक्तीचे योग्य ठिकाणी उभे राहणे अत्यंत आवश्यक असते. नाहीतर सैन्यव्यवस्था विस्कळित होते. म्हणून दुर्योधनाचे स्वत: द्रोणाचार्यांजवळ जाणे योग्यच होते.

या ठिकाणी एक शंका घेतली जाऊ शकते की, दुर्योधनाने तर सेनापती भीष्माचार्यांजवळ जावयास पाहिजे होते. पण दुर्योधन गुरू द्रोणाचार्यांजवळच का गेला? याचे समाधान असे—द्रोणाचार्य आणि भीष्माचार्य हे दोघेही उभय पक्षपाती होते अर्थात् ते कौरव आणि पांडव या दोघांचाही पक्ष घेत होते. त्या दोघांपैकीही द्रोणाचार्यांना जास्त खुश करावयाचे होते. कारण द्रोणाचार्यांशी दुर्योधनाचे गुरूच्या नात्याने तर प्रेम होते, परंतु कुटुंबाच्या नात्याने प्रेम नव्हते आणि अर्जुनावर द्रोणाचार्यांची विशेष कृपा होती. म्हणून त्यांना खुश करण्यासाठी दुर्योधनाचे त्यांच्याजवळ जाणेच योग्य होते. व्यवहारातही आपणाला असे दिसून येते की, ज्याच्याशी आपली विशेष प्रीती नाही त्याच्याकडून आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठी मनुष्य त्याला जास्त आदर देऊन खुश करतो.

दुर्योधनाला असा विश्वास होता की, भीष्माचार्य तर आपले पितामहच आहेत. त्यांच्याजवळ नाही गेलो तर काही वावगे होणार नाही. त्यांच्याकडे न जाण्याने जरी ते नाराज झाले तरी मी कोणत्याही प्रकाराने त्यांना राजी करून घेईन. कारण पितामह भीष्माचार्यांशी दुर्योधनाचा कौटुंबिक संबंध आणि प्रियता होतीच. याच कारणामुळे भीष्माचार्यांनी दुर्योधनाला खुश करण्यासाठी दीर्घ स्वरात आपला शंख वाजविला. (गीता १।१२)

"**वचनमब्रवीत्**"—या ठिकाणी "**अब्रवीत्**" म्हणणेच योग्य होते. कारण "**अब्रवीत्**" क्रियेच्या अंतर्गतच "**वचनम्**" येते अर्थात् दुर्योधन बोलेल ते वचनच बोलेल. म्हणून येथे "**वचनम्**" शब्दाची आवश्यकता नव्हती. तरीपण "**वचनम्**" शब्द देण्याचे तात्पर्य दुर्योधन नीतियुक्त अशी गंभीर वचने बोलतो की, ज्यामुळे द्रोणाचार्यांच्या मनांत पांडवाविषयी द्वेष भावना निर्माण व्हावी आणि ते आपल्याच बाजूने राहून उत्तम प्रकारे लढावेत. ज्यामुळे आपला विजय होईल आणि आपला स्वार्थ साधला जाईल.

***संबंध**—द्रोणाचार्यांजवळ जाऊन दुर्योधन काय वचने बोलला, ती वचने पुढील श्लोकात सांगितली आहेत.*

## पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्।
## व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता॥ ३ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आचार्य** | = हे आचार्य! | **द्रुपदपुत्रेण** | = द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नद्वारा | **एताम्** | = ही |
| **तव** | = आपला | **व्यूढाम्** | = व्यूहरचनात्मक उभी केलेली | **महतीम्** | = प्रचंड |
| **धीमता** | = बुद्धिमान् | | | **चमूम्** | = सेना |
| **शिष्येण** | = शिष्य | **पाण्डुपुत्राणाम्** | = पांडवांची | **पश्य** | = पहा! |

***व्याख्या**—* "**आचार्य**"—द्रोणाचार्यांना "आचार्य" असे संबोधण्यामध्ये दुर्योधनाचा असा भाव दिसतो की, आपण आम्हा सर्वांचे-कौरवांचे आणि पांडवांचे आचार्य (गुरू) आहात. आम्हाला आपण शस्त्रविद्या शिकविली असल्याने आपण आम्हा सर्वांचे गुरू आहात. म्हणून आपल्या मनात कोणाचाही पक्ष अथवा आग्रह नसावा.

"**तव शिष्येण धीमता**"—या पदांचा प्रयोग करण्यामागे दुर्योधनाचा हेतू असा आहे की, आपण इतक्या सरळ स्वभावाचे आहात की, आपणाला मारण्यासाठीच उत्पन्न झालेल्या धृष्टद्युम्नालाही आपण शस्त्रास्त्र विद्या शिकविली आहे आणि तो शिष्य धृष्टद्युम्न इतका बुद्धिवान आहे की, त्याने आपणाला मारण्याकरिताच आपणाकडून शस्त्रास्त्र विद्या शिकली आहे.

"**द्रुपदपुत्रेण**"—या पदाचे प्रयोजन यासाठी आहे की, आपणाला मारण्याच्या उद्देशाने राजा द्रुपदाने याज आणि उपयाज नावाच्या ब्राह्मणांकडून यज्ञ करविला होता. त्या यज्ञामुळे धृष्टद्युम्न उत्पन्न झाला. तोच हा द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न आपल्यासमोर (विरुद्ध बाजूकडून) सेनापतीच्या रूपामध्ये उभा आहे.

जरी दुर्योधन येथे "द्रुपदपुत्रा" च्या ऐवजी धृष्टद्युम्नही म्हणू शकत होता. तरीपण द्रोणाचार्यांशी द्रुपदाचे जे वैर होते, त्या वैरभावाचा बदला घेण्याची हीच उत्तम संधी (वेळ) आहे अशी आठवण करून देण्यासाठी दुर्योधन येथे "**द्रुपदपुत्रेण**" ह्या शब्दाचा प्रयोग करतो.

**''पाण्डुपुत्राणाम् एतां व्यूढां महतीं चमूं पश्य''**— 'द्रुपदपुत्राने व्यूहाकार ऊभी केलेली ही पांडवांची प्रचंड सेना पहा.' तात्पर्य—ज्या पांडवांविषयी आपणाला प्रीती आहे त्याच पांडवांनी आपल्याला (द्रोणाचार्यांना) मारणाऱ्या द्रुपदपुत्राला सेनापती पद देऊन व्यूहाकार सैन्य उभे करण्याचा अधिकार दिला आहे. जर पांडवांना आपल्याविषयी आत्मीयता असती तर त्यांनी कमीत-कमी तुम्हाला मारणाऱ्याला तरी आपल्या सैन्याचा मुख्य सेनापती केले नसते आणि एवढा मोठा अधिकार दिला नसता. परंतु सर्व काही जाणत असूनही त्यांनी त्यालाच आपला सेनापती केले आहे.

जरी कौरवांच्या सैन्यापेक्षा पांडवांचे सैन्य संख्येने कमी होते अर्थात् कौरवांचे सैन्य अकरा अक्षौहिणी* आणि पांडवांचे सैन्य सात अक्षौहिणी होते. तरीपण दुर्योधन पांडवांच्या सैन्याला प्रचंड सेना म्हणून दाखवितो. पांडवांच्या सैन्याला 'प्रचंड सेना' म्हणण्याचे (दुर्योधनाचे) दोन भाव (उद्देश) दिसून येतात. (१) पांडवाचे सैन्य अशा रीतीने व्यूहाकार रचले गेले होते की, ते कमी असूनही दुर्योधनास जास्त भासत होते. (२) पांडवांच्या सैन्यातील सर्वचे सर्व योद्धे एकाच मताचे होते. या एकीमुळे पांडवांची थोडी असलेली सेनासुद्धा बलाने, उत्साहाने फार मोठी दिसत होती. अशी सेना दाखवून दुर्योधन द्रोणाचार्यांना असे सांगू इच्छितो की, आपण या सैन्याला सामान्य किंवा छोटे समजू नका. आपण आपली विशेष शक्ती लावून सावधपणे युद्ध करा. पांडवांचा सेनापती आपला शिष्य द्रुपदपुत्रच तर आहे. म्हणून त्याच्यावर विजय मिळविणे आपल्यासाठी काय अवघड आहे?

**''एतां पश्य''**—असे म्हणण्याचे तात्पर्य, पांडवसेना युद्धासाठी तयार होऊन आपल्यासमोर उभी आहे. तर मग आपण त्या सैन्यावर कोणत्या प्रकारे विजय मिळवू शकतो. याविषयी आपण लवकरात लवकर निर्णय घ्यायला पाहिजे.

***संबंध***—*द्रोणाचार्यांना पांडवांची सेना पाहण्याविषयी प्रार्थना करून आता दुर्योधन त्यांना पांडव सेनेतील महारथींना दाखवित आहे.*

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**
**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्।**
**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः ॥ ५ ॥**
**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

**अत्र** = येथे (पांडवाच्या सैन्यामध्ये)
**शूराः** = मोठ-मोठे शूरवीर आहेत,
**महेष्वासाः** = (ज्यांचे) विशाल आकाराचे धनुष्य आहेत
**च** = आणि (जे)
**युधि** = युद्ध कलेत
**भीमार्जुनसमाः** = भीम आणि अर्जुनासमान आहेत. (त्यात)
**युयुधानः** = युयुधान (सात्यकी)
**विराटः** = राजा विराट
**च** = आणि
**महारथः** = महारथी
**द्रुपदः** = द्रुपद (सुद्धा आहेत.)
**धृष्टकेतुः** = धृष्टकेतु
**च** = व
**चेकितानः** = चेकितान
**च** = आणि
**वीर्यवान्** = पराक्रमी
**काशिराजः** = काशिराज (सुद्धा आहेत.)
**पुरुजित्** = पुरुजित्
**च** = आणि
**कुन्तिभोजः** = कुन्तिभोज (हे दोघे बंधू)
**च** = तसेच
**नरपुङ्गवः** = मानवात श्रेष्ठ
**शैब्यः** = शैब्य (ही आहेत.)
**विक्रान्तः** = पराक्रमी
**युधामन्युः** = युधामन्यु
**च** = आणि

* एक अक्षौहिणी सेनेमध्ये २१८७० रथ, २१८७० हत्ती, ६५६१० घोडे आणि १०९३५० पायदळ सैनिक असतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **वीर्यवान्** | = पराक्रमी | **सौभद्रः** | = सुभद्रापुत्र अभिमन्यु | | | (पुत्र) (ही आहेत.) |
| **उत्तमौजाः** | = उत्तमौजा | **च** | = आणि | **सर्वे, एव** | = (हे) सर्वचे सर्व | |
| | (ही आहेत.) | **द्रौपदेयाः** | = द्रौपदीचे पाच | **महारथाः** | = महारथी आहेत. | |

***व्याख्या***— **'अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि'**—ज्यांच्या साहाय्याने बाण चालवले (फेकले) जातात त्यांचे नाव 'इष्वास' अर्थात् धनुष आहे. असे विशाल आकारांचे इष्वास (धनुष्य) ज्यांचे जवळ आहेत. ते सर्व महेष्वास (धनुर्धारी) आहेत. तात्पर्य—विशाल धनुष्यावर बाण योजून प्रत्यंचा (दोरी) ओढण्यासाठी खूप ताकद (शक्ती) लागते. शक्तिनिशी सोडलेला बाण विशेष मारा करतो. असे विशाल धनुष्य जवळ बाळगत असल्याने हे सर्व खूप बलवान आणि शूरवीर आहेत. हे सामान्य योद्धे नव्हेत, युद्धकलेमध्ये ते भीम आणि अर्जुनाप्रमाणे निपुण आहेत. अर्थात् भीमाप्रमाणे बलवान आणि अर्जुनाप्रमाणे शस्त्रकलेमध्ये निपुण आहेत.

**'युयुधानः'**—युयुधानाने (सात्यकि) अर्जुनापासून शस्त्रास्त्र विद्या शिकली होती. म्हणून भगवान् श्रीकृष्णांनी दुर्योधनाला आपले नारायणी सैन्य दिले तरीही तो अर्जुनाशी कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी अर्जुनाच्याच बाजूने राहिला, दुर्योधनाच्या पक्षात गेला नाही. द्रोणाचार्यांच्या मनात अर्जुना-विषयी द्वेषभावना निर्माण करण्यासाठी दुर्योधन महारथ्यांपैकी सर्वप्रथम अर्जुनाचा शिष्य युयुधानाचेच नाव घेतो. तात्पर्य—हा अर्जुन तर पहा, ज्याने आपणापासूनच विद्या ग्रहण केली आणि जगामध्ये तुझ्यासारखा कोणीही धनुर्धारी होणार नाही असा प्रयत्न करीन,* असे वरदानही आपण अर्जुनाला दिले आहे. अशा प्रकारे आपला तर शिष्य अर्जुन ह्याचेवर इतका स्नेह आहे. परंतु तो कृतघ्न होऊन विरुद्ध बाजूने लढण्यास उभा आहे. पण अर्जुनाचा शिष्य सात्यकि मात्र आपल्या गुरूच्याच पक्षात उभा आहे (युयुधान महाभारत-युद्धामध्ये न मरता यादवांच्या आपसातील युद्धात मारले गेले)

**'विराटश्च'**—हा विराट राजा की, ज्याच्याकडून आमच्या बाजूचे वीर सुशर्मा अपमानित झाले आहेत. आपणही त्यांच्या संमोहन अस्त्रामुळे मोहित झाला होता आणि आम्हालाही ज्यांच्या गायी सोडून पळून जावे लागले होते. तो आपल्या विरुद्ध पक्षाकडे उभा आहे. राजा विराटाशी द्रोणाचार्यांचा कोणताच द्वेष किंवा वैरभाव नव्हता पण दुर्योधनाला असे वाटले की, जर युयुधानानंतर मी द्रुपदाचे नाव घेईल तर द्रोणाचार्यांना असे वाटेल की, दुर्योधन मला पांडवांविरुद्ध युद्ध करण्यास उत्तेजित करत असून त्यांच्याविषयी माझ्या मनात वैरभाव निर्माण करीत आहे. म्हणून दुर्योधन धूर्तपणाने (चलाखीने) द्रुपदापूर्वी विराटाचे नाव घेत आहे की, ज्यामुळे आपली चलाखी द्रोणाचार्यांना ओळखू येऊ नये आणि त्यांनी विशेष मन लावून युद्ध करावे. (राजा विराट, उत्तर, श्वेत आणि शंख या तिन्ही पुत्रांसहित महाभारतयुद्धात मारले गेले)

**'द्रुपदश्च महारथः'**—आपण द्रुपदराजाला आपल्या अगोदरच्या मैत्रीची आठवण करून दिली होती परंतु त्याने "मी एक राजा आहे आणि तुम्ही भिक्षुक आहात तेव्हा तुमची आणि माझी मैत्री कशी होऊ शकते?" असे बोलून त्याने भरसभेत आपला अपमान केला होता. तसेच मनात वैरभाव ठेवून आपणाला मारण्यासाठी त्याने पुत्रसुद्धा उत्पन्न केला. तोच महारथी द्रुपदराजा आपल्या विरुद्ध लढण्यासाठी विपक्षात उभा आहे. (राजा द्रुपद युद्धात द्रोणाचार्यांकडून मारले गेले)

**'धृष्टकेतुः'**—हा धृष्टकेतु किती मूर्ख आहे की, ज्याच्या पित्याला (शिशूपाल) श्रीकृष्णाने भर सभेत सुदर्शन चक्राने ठार मारले. तो श्रीकृष्णाच्याच पक्षाकडून लढण्यासाठी उभा आहे. (धृष्टकेतु द्रोणाचार्यांकडून मारले गेले)

**'चेकितानः'**—ही सर्व यादवसेना तर आमच्या बाजूने लढण्यासाठी तयार आहे आणि हा यादव चेकितान पांडवांकडून लढण्यासाठी उभा आहे. (दुर्योधनाकडून चेकितान मारले गेले)

**'काशिराजश्च वीर्यवान्'**—हा काशिराज अत्यंत शूर आणि महारथी आहे. हाही पांडवाच्या बाजूकडून लढण्यासाठी उभा आहे. हा पराक्रमी असल्याकारणाने आपण अत्यंत सावधगिरीने युद्ध करावे. (काशिराज महाभारत-युद्धात मारले गेले)

**'पुरुजित्कुन्तिभोजश्च'**—पुरुजित् आणि कुंतिभोज हे दोघेही कुंतीचे भाऊ असल्याने आमचे आणि पांडवांचे "मामा" आहेत. असे असूनही ते पक्षपाती असल्याने आमच्या विरुद्ध बाजूने लढण्यासाठी उभे आहेत. (हे दोघे-ही युद्धात द्रोणाचार्यांकडून मारले गेले)

**'शैब्यश्च नरपुङ्गवः'**—हा शैब्य युधिष्ठिराचा सासरा आहे. हा मनुष्यांमध्ये श्रेष्ठ आणि अत्यंत बलवान आहे.

* प्रयतिष्ये तथा कर्तुं यथा नान्यो धनुर्धरः।
त्वत्समो भविता लोके सत्यमेतद् ब्रवीमि ते॥ (महाभारत, आदि० १३१।२७)

परिवाराच्या दृष्टीने हा आमचाही नातलग आहे. परंतु हा पांडवांच्याच बाजूने युद्धासाठी उभा आहे.

**'युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्'**—पांचाल देशाचे अत्यंत बलवान आणि शूरवीर योद्धे युधामन्यु आणि उत्तमौजा माझ्या वैऱ्याच्या-अर्जुनाच्या रथाच्या चाकांचे रक्षण करण्यासाठी नेमले आहेत. आपण त्यांच्याकडे लक्ष ठेवावे. (रात्री झोपलेले असताना ह्या दोघांनाही अश्वत्थामाने ठार मारले)

**'सौभद्रः'**—हा श्रीकृष्णाची बहीण सुभद्रा हिचा पुत्र आहे. याचे नाव अभिमन्यु आहे. हा अत्यंत शूर असा वीर आहे. हा गर्भावस्थेतच (जन्मापूर्वी आईच्या उदरात असताना) चक्रव्यूह भेदनाची विद्या शिकला आहे. म्हणून आपल्या सैन्याची चक्रव्यूहाकार रचना करताना आपण अभिमन्युकडे लक्ष ठेवावे. (महाभारत-युद्धात दु:शासनपुत्राकडून अन्यायपूर्वक डोक्यावर गदेचा प्रहार केल्यामुळे अभिमन्यु मारले गेले)

**'द्रौपदेयाश्च'**—युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल आणि सहदेव या पाच जणांचे, द्रौपदीच्या उदरी जन्मलेले, अनुक्रमे, प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकर्मा, शतानीक आणि श्रुतसेन हे पुत्र आहेत. आपण या पाचही जणांना पहा., द्रौपदीने माझी भर सभेत थट्टा करून माझे हृदय दुखविले आहे. म्हणून आपण या पाचही जणांना ठार मारून बदला घ्यावा. (रात्री झोपलेले असताना या पाचही जणांना अश्वत्थामाने ठार मारले)

**'सर्व एव महारथाः'**—हे सर्वचे सर्व महारथी आहेत.तसेच ते शस्त्रविद्येत आणि शास्त्रामध्येही प्रवीण आहेत. युद्धामध्ये जो वीर एकटाच दहा दहा हजार धनुर्धारी सैन्याचे संचालन करू शकतो अशा वीर पुरुषास महारथी* म्हणतात. असे कितीतरी महारथी पांडवांच्या बाजूने लढाईसाठी उभे आहेत.

*संबंध—द्रोणाचार्यांच्या मनात पांडवांविषयी द्वेष निर्माण करण्यासाठी युद्धात त्यांना उत्तेजन मिळावे या दृष्टीने दुर्योधनाने पांडवसेनेची विशेषता वर्णन केली. दुर्योधनाने असा विचार केला की, द्रोणाचार्य तर पांडवांचे पक्षपाती आहेतच. कदाचित ते पांडवसेनेची ही विशेषता ऐकून असे म्हणू शकतील की, जर पांडवाच्या सैन्यात एवढी विशेषता आहे तर त्यांच्याशी तडजोड का करत नाही? असा विचार येताच दुर्योधन आता पुढील तीन श्लोकांत आपल्या सैन्याची विशेषता वर्णन करतो.*

## अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।
## नायका मम सैन्यस्य सञ्ज्ञार्थं तान्ब्रवीमि ते॥७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **द्विजोत्तम** | = हे द्विजोत्तम! | **तान्** | = त्यांच्याकडे (ही आपण) | **मम** | = माझ्या |
| **अस्माकम्** | = आमच्या | | | **सैन्यस्य** | = सैन्यातील (जे) |
| **तु** | = पक्षामध्येही | **निबोध** | = लक्ष द्या | **नायकाः** | = नायक आहेत, |
| **ये** | = जे | **ते** | = आपणाला | **तान्** | = त्यांची नावे (मी) |
| **विशिष्टाः** | = प्रमुख (आहेत) | **सञ्ज्ञार्थं** | = आठवण देण्यासाठी | **ब्रवीमि** | = सांगतो. |

*व्याख्या*—**'अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम'**—दुर्योधन द्रोणाचार्यांना म्हणतो की, हे द्विजश्रेष्ठा, ज्याप्रमाणे पांडवांच्या सैन्यामध्ये श्रेष्ठ महारथी आहेत. त्याचप्रमाणे आमच्या सैन्यामध्येसुद्धा त्यांच्या सैन्यातील महारथ्यांपेक्षाही काही कमी दर्जाचे महारथी नाहीत. तर त्यांच्यापेक्षाही श्रेष्ठ दर्जाचे महारथी आहेत. त्यांनाही आपण समजून घ्या.

तिसऱ्या श्लोकामध्ये **'पश्य'** आणि या ठिकाणी **'निबोध'** ह्या क्रिया देण्याचे तात्पर्य पांडवांचे सैन्य तर समोर उभे आहे. म्हणून ते दाखविण्यासाठी दुर्योधन **'पश्य'** (पहा) या क्रियेचा उपयोग करतो. परंतु आपले सैन्य (कौरवांचे सैन्य) समोर नाही. अर्थात् आपल्या सैन्याकडे द्रोणाचार्यांची पाठ आहे. म्हणून त्याविषयी पहा न म्हणता त्यांच्याकडे लक्ष देण्यासाठी दुर्योधन **'निबोध'** (ध्यान द्यावे) या क्रियेचा प्रयोग करतो.

**'नायका मम सैन्यस्य सञ्ज्ञार्थं तान्ब्रवीमि ते'**—माझ्या सेनेत सुद्धा जे विशिष्ट-विशिष्ट सेनापती, सेनानायक आहेत, महारथी आहेत. मी त्यांची नावे केवळ आपणाला स्मरण करून देण्यासाठी, आपली दृष्टी तिकडे वळावी यासाठी सांगत आहे.

**'सञ्ज्ञार्थम्'**—तात्पर्य, आमच्या असंख्य सेनानायकांची नावे आपणाला कुठवर सांगू? मी त्यांच्याकडे केवळ अंगुली निर्देश करीत आहे. कारण त्या सर्वांना आपण जाणता.

या श्लोकात दुर्योधनाचा असा भाव प्रतीत होतो की,

* एको दशसहस्त्राणि योधयेद् यस्तु धन्विनाम्। शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः॥

आमचा पक्षही काही कमजोर नाही. परंतु राजनीतिनुसार शत्रुपक्ष कितीही कमजोर असला आणि आपला पक्ष कितीही बलवान असला तरीही कोणत्याही परिस्थितीत शत्रुपक्षाला कमजोर समजू नये आणि आपल्यात कोणत्याही प्रकारची उपेक्षा, उदासीनता इत्यादी भावना येऊ देऊ नयेत. म्हणून सावधगिरीसाठी मी आपणाला त्यांच्या सैन्याविषयी बोललो आणि आता आपल्या सैन्याविषयी सांगतो.

दुसरा भाव असा की, पांडवांच्या सेनेला पाहून दुर्योधनावर त्याचा फार प्रभाव पडला आणि त्याच्या मनामध्ये थोडे भयसुद्धा उत्पन्न झाले. कारण संख्येने कमी असले तरी पांडवांच्या सैन्यामध्ये पुष्कळसे धर्मात्मे होते आणि स्वतः श्रीकृष्ण भगवान्‌ही होते. ज्या पक्षात धर्म आणि भगवान् असतात त्याचा सर्वांवर मोठा प्रभाव पडतो. अत्यंत पापी आणि दुष्टातीदुष्ट व्यक्तीवरही त्याचा प्रभाव पडतो. इतकेच नव्हेतर पशू, पक्षी, वृक्ष, लता इत्यादीवरही त्याचा प्रभाव पडतो. कारण धर्म आणि भगवान् नित्य आहेत. भौतिक शक्ती कितीही उच्चतम असोत, त्या सर्व अनित्यच आहेत. म्हणून पांडवसेनेचा दुर्योधनावर फार मोठा प्रभाव पडला. परंतु त्याचा भौतिक शक्तीवर मुख्यत्वाने विश्वास असल्याने तसा विश्वास द्रोणाचार्यांना दाखविण्यासाठी म्हणतो की, आमच्या पक्षात जितकी विशेषता आहे तितकी पांडवांच्या सैन्यात नाही. म्हणून आम्ही त्यांच्यावर सहज विजय मिळवू शकतो.

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जयः।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च॥८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भवान्** | = आपण (द्रोणाचार्य) | **कर्णः** | = कर्ण | **एव** | = च |
| **च** | = आणि | **च** | = आणि | **अश्वत्थामा** | = अश्वत्थामा, |
| **भीष्मः** | = पितामह भीष्म | **समितिञ्जयः** | = संग्रामविजयी | **विकर्णः** | = विकर्ण |
| **च** | = तसेच | **कृपः** | = कृपाचार्य | **च** | = आणि |
| | | **च** | = तसेच व | **सौमदत्तिः** | = सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. |
| | | **तथा** | = त्याप्रमाणे | | |

*व्याख्या*— **'भवान्भीष्मश्च'**—आपण स्वतः आणि पितामह भीष्म अत्यंत विशेषतापूर्ण पुरुष आहात. आपल्या दोघांची बरोबरी करणारा संसारामध्ये तिसरा कोणीही पुरुष नाही. आपल्या दोघांपैकी कोणीही एकजण पूर्ण शक्तिनिशी युद्ध करील तर आपणासमोर देवता, यक्ष, राक्षस, मनुष्य इत्यादींपैकी कोणीही टिकाव धरू शकणार नाही. आपल्या उभयतांचा पराक्रम संपूर्ण जगात प्रसिद्धच आहे. पितामह भीष्म तर बालब्रह्मचारी आणि इच्छामरणी आहेत अर्थात् त्यांच्या इच्छेशिवाय त्यांना कोणीही मारू शकत नाही.

(महाभारत युद्धामध्ये द्रोणाचार्य धृष्टद्युम्नाकडून मारले गेले आणि पितामह भीष्माचार्यांनी उत्तरायण सुरू झाल्यानंतर आपल्या इच्छेनुसार प्राणत्याग केला.)

**'कर्णश्च'**—कर्ण तर अत्यंत शूरवीर आहे. मला तर असा विश्वास आहे की, तो एकटाच संपूर्ण पांडव सेनेवर विजय मिळवील. त्याच्यासमोर अर्जुनाचेही काही चालत नाही. असा शूरवीर कर्ण आमच्या बाजूकडून आहे.

(महाभारत युद्धात कर्ण अर्जुनाकडून मारला गेला)

**'कृपश्च समितिञ्जयः'**—कृपाचार्यांची तर गोष्ट काय सांगावी! ते तर चिरंजीव* आहेत. ते आमचे परम हितचिंतक असून संपूर्ण पांडव सैन्यावर विजय प्राप्त करू शकतात. जरी या ठिकाणी द्रोणाचार्य आणि भीष्माचार्य ह्यांचे नंतरच दुर्योधनाने कृपाचार्यांचे नाव घ्यावयाला पाहिजे होते. परंतु दुर्योधनाचा कर्णावर जेवढा विश्वास होता तेवढा कृपाचार्यांवर नव्हता. म्हणून कर्णाचे नाव तर त्याच्या अंतःकरणातून मध्येच बाहेर पडले. भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य यांनी हा कृपाचार्यांचा अपमान आहे असे समजू नये. म्हणून दुर्योधन कृपाचार्यांना ''संग्रामविजयी'' हे विशेषण लावून त्यांना खुश करू पाहतो.

**'अश्वत्थामा'**—हेही चिरंजीव असून आपले पुत्र आहेत. हे फारच शूरवीर आहेत. यांनी आपल्यापासूनच शस्त्र-अस्त्र विद्या शिकली असून ते शस्त्रास्त्र कलेमध्ये अत्यंत निपुण आहेत.

**'विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च'**—आपण असे समजू नका की, केवळ पांडवच धर्मात्मे आहेत. आमच्याही

* अश्वत्थामा, बलि, वेदव्यास, हनुमान, विभीषण, कृपाचार्य, परशुराम आणि मार्कंडेय हे आठ चिरंजीवी आहेत—शास्त्रात लिहिले आहे-

अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च विभीषणः। कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः॥
सप्तैतान् संस्मरेन्नित्यं मार्कण्डेयमथाष्टमम्। जीवेद्वर्षशतं सोऽपि सर्वव्याधिविवर्जितः॥

पक्षाकडील माझा बंधू विकर्ण महान धर्मात्मा आणि शूरवीर आहे. तसेच आमचे पणजोबा शांतनूचे बंधू बाल्हीकाचे नातू तसेच सोमदत्ताचे पुत्र भूरिश्रवाही फार धर्मात्मा आहेत. यांनी विपुल दक्षिणेचे मोठ-मोठे यज्ञ केले आहेत. हे मोठे पराक्रमी आणि महारथी आहेत.

(युद्धात विकर्ण भीमाद्वारा आणि भूरिश्रवा सात्यकि-द्वारा मारले गेले.)

या ठिकाणी शूरवीरांची नावे घेण्यामागे दुर्योधनाचा असा आशय दिसतो की; हे आचार्य, आमच्या सैन्यामध्ये आपण स्वत:, भीष्माचार्य, कर्ण, कृपाचार्य इत्यादी जसे महान पराक्रमी शूरवीर आहेत. तसे योद्धा पांडवांच्या सैन्यात दिसत नाहीत. आमच्या सैन्यामध्ये कृपाचार्य आणि अश्वत्थामा हे दोघेजण चिरंजीवी आहेत. परंतु पांडवांच्या सैन्यामध्ये असा एकही चिरंजीवी नाही. आमच्या सैन्यामध्ये धर्मात्म्यांचीही काही कमतरता नाही. म्हणून आपणाला भिण्याचे (घाबरण्याचे) मुळीच कारण नाही.

## अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः।
## नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः॥ ९॥

**अन्ये** = याशिवाय
**बहवः** = पुष्कळ
**शूराः** = शूरवीर आहेत, (ज्यांनी)
**मदर्थे** = माझ्यासाठी
**त्यक्तजीविताः** = स्वत:च्या जगण्याच्या इच्छेचाही त्याग केला आहे.
**च** = आणि
**नानाशस्त्र-** = जे अनेक
**प्रहरणाः** प्रकारचे अस्त्र-शस्त्र चालवणारे आहेत (तसेच जे)
**सर्वे** = सर्वचे सर्व
**युद्धविशारदाः** = युद्धकलेत अत्यंत चतुर आहेत.

*व्याख्या*— **'अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्त-जीविताः'**—मी आत्तापर्यंत आपल्या सैन्यातील जितक्या शूर वीरांची नावे सांगितली आहेत. त्यांच्या व्यतिरिक्त सुद्धा आमच्या सैन्यामध्ये बाल्हीक, शल्य, भगदत्त, जयद्रथ इत्यादी अनेक शूरवीर महारथी आहेत. जे माझ्या भल्यासाठी माझ्या बाजूकडून युद्ध करण्यासाठी आपल्या प्राणांची आशा सोडून येथे आले आहेत. मला विजय प्राप्त करून देण्यासाठी ते प्राणार्पणही करतील. पण मागे हटणार नाहीत. त्यांचेविषयी मी आपल्यासमोर कोणत्या शब्दात कृतज्ञता व्यक्त करू?

**'नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः'**— हे सर्व-लोक हातांनी प्रहार करण्यासारखी शस्त्रे तलवार, गदा, त्रिशुल इत्यादी निरनिराळ्या प्रकारच्या शस्त्र-कलेमध्ये प्रवीण आहेत आणि हाताने फेकून प्रहार करण्यासारखी शस्त्रे, बाण, तोमर, शक्ती इत्यादी अस्त्र-कलेमध्येही निपुण आहेत. युद्ध कसे करावे, कोणत्या प्रकारे करावे, कोणत्या युक्त्या योजाव्यात, सेनेला कशा प्रकारे उभे करावे वगैरे प्रकारच्या कलेमध्ये ते अत्यंत प्रविण व कुशल आहेत.

***संबंध**—दुर्योधनाची वचने ऐकून जेव्हा द्रोणाचार्य काहीच बोलले नाहीत तेव्हा आपली चलाखी (धूर्तपणा) न चालू शकल्याने दुर्योधनाच्या मनात कोणते विचार येतात ते संजय पुढील श्लोकात सांगतात**

## अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्।
## पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्॥ १०॥

द्रोणाचार्यांना गप्प पाहून दुर्योधनाच्या मनात विचार आला की, वास्तविक—

**अस्माकम्** = आमची
**तत्** = ती
**बलम्** = सेना (पांडवांवर विजय मिळविण्यात)
**अपर्याप्तम्** = अपर्याप्त आहे, असमर्थ आहे; कारण
**भीष्माभिरक्षितम्** = तिचे संरक्षक (उभय पक्षपाती) भीष्माचार्य आहेत.
**तु** = परंतु
**एतेषाम्** = या पांडवांची
**इदम्** = ही
**बलम्** = सेना (आमच्यावर विजय मिळविण्यात)
**पर्याप्तम्** = पर्याप्त आहे, समर्थ आहे; (कारण)
**भीमाभिरक्षितम्** = तिचे संरक्षक (निज सेना पक्षपाती) भीमसेन आहेत.

* संजय, व्यासानी प्रदान केलेल्या दिव्य दृष्टीच्या योगाने सैनिकांच्या मनात आलेले विचारही जाणून घेण्याला समर्थ होते.
प्रकाशं वाप्रकाशं वा दिवा वा यदि वा निशि। मनसा चिन्तितमपि सर्वं वेत्स्यति सञ्जयः॥ (महाभारत भीष्म० २।११)

*व्याख्या*—**'अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्'**—अधर्म, अन्याय इत्यादी कारणामुळे दुर्योधनाच्या मनात भय उत्पन्न झाल्याने तो आपल्या सैन्याविषयी विचार करतो की, आपले सैन्य जास्त असूनही अर्थात् पांडवांच्या सैन्यापेक्षा चार अक्षौहिणी जास्त असूनही पांडवांवर विजय मिळविण्यासाठी तर ते असमर्थच आहे. कारण आमच्या सैन्यामध्ये मतभेद आहेत. पांडवांच्या सैन्यामध्ये जेवढे संघटन, एकता, निर्भयता, नि:संकोचता आहे तेवढे आमच्या सैन्यात दिसून येत नाही. आमच्या पक्षाचे मुख्य संरक्षक पितामह भीष्माचार्य उभयपक्षपाती आहेत. अर्थात्, त्यांना कौरवांची आणि पांडवांची दोघांचीही आत्मीयता आहे. ते श्रीकृष्णाचे महान भक्त आहेत. त्यांच्या हृदयात युधिष्ठिराविषयी फार आदर आहे. त्यांची अर्जुनावरही फार प्रीती आहे. म्हणून ते आमच्या पक्षाकडून असूनही पांडवांचेच कल्याण इच्छितात. तेच भीष्माचार्य आमच्या सैन्याचे सेनापती आहेत. अशा परिस्थितीमध्ये आमचे सैन्य पांडव सैन्याशी सामना करण्यास कसे समर्थ असणार? कदापिही नाही

**'पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्'**—परंतु हे पांडवसैन्य आमच्यावर विजय मिळविण्याला समर्थ आहे. कारण त्यांच्या सैन्यात मतभेद नाहीत तर सर्वजण एकमताने संघटित झालेले आहेत. मला लहानपणापासून हारवीत आलेला भीम जो बलवान आहे तो पांडव सैन्याचा संरक्षक आहे. त्याने एकट्यानेच माझ्यासह आम्हा शंभरही बांधवांना मारण्याची प्रतिज्ञा केली आहे. अर्थात् हा आमचा नाश करण्यासाठी तत्पर झाला आहे. याचे शरीर वज्राप्रमाणे कठीण आणि मजबूत आहे. मी याला विष पाजविले होते तरी हा मेला नाही. असा हा भीमसेन पांडव सैन्याचा संरक्षक आहे. म्हणून पांडवांचे सैन्य वास्तविकपणे पूर्ण समर्थ आहे.

येथे एक शंका अशी घेतली जाऊ शकते की, दुर्योधनाने आपल्या सैन्याच्या सेनापतीपदी नियुक्त केलेल्या भीष्माचार्यांचे नाव सैन्य संरक्षक म्हणून घेतले. परंतु पांडव सैन्याचे संरक्षक म्हणून भीमसेनाचे नाव घेतले. तो तर पांडव सैन्याचा सेनापती नाही. समाधान—यावेळी दुर्योधन सेनापतीविषयी विचार करीत नाही तर दोन्ही सैन्याच्या शक्तीविषयी विचार करीत आहे की, कोणाचे सैन्य अधिक शक्तिशाली आहे. दुर्योधनावर सुरवातीपासूनच भीमसेनाच्या शक्तीचा, बलाचा प्रभाव खूपच पडलेला आहे. म्हणून पांडव सैन्याचा संरक्षक म्हणून तो भीमसेनाचे नाव घेत आहे.

**विशेष गोष्ट**

अर्जुन कौरव सैन्याला पाहून कोणाच्याही जवळ न जाता हातामध्ये धनुष्य उचलून घेतो. (गीता १।२०) परंतु दुर्योधन पांडव सैन्याला पाहून द्रोणाचार्यांजवळ जातो आणि त्या व्यूहरचनात्मक उभी केलेली पांडवांची सेना पहावयास लावतो. यावरून सिद्ध होते की, दुर्योधनाच्या अंत:करणात भीतीने घर केले आहे.* असे असूनही तो धूर्तपणाने द्रोणाचार्यांना खुश करू पाहतो आणि त्यांना पांडवांविरुद्ध भडकाविण्याचा प्रयत्न करतो. कारण दुर्योधनाच्या हृदयात अधर्म, अन्याय, पाप आहे. अधर्मी, अन्यायी आणि पापी व्यक्ती कधीही निर्भय आणि सुखशांतियुक्त राहू शकत नाही—हा नियम आहे. परंतु अर्जुनाच्या अंत:करणात धर्म आहे, न्याय आहे. म्हणून अर्जुनाच्या ठिकाणी आपला स्वार्थ साधण्यासाठी चलाखी नाही, भीती नाही तर उत्साह आणि वीरता आहे. म्हणूनच तर तो आवेशात येऊन सैन्य निरीक्षण करण्यासाठी भगवंताला आज्ञा देतो की, हे अच्युत! दोन्ही सैन्याच्या मध्यभागी माझा रथ उभा करा. (१।२१) याचे तात्पर्य, ज्यांच्या ठिकाणी ह्या नाशवंत धन, संपत्तीचा आश्रय आहे, आदर आहे आणि ज्यांच्या हृदयात अधर्म, अन्याय आणि दुर्भावना आहे, त्याच्या ठिकाणी वास्तविकपणे बल नसते. ते आतून घाबरलेले असतात आणि ते कधीही निर्भय नसतात. परंतु जे धर्मपालन करतात आणि ज्यांना भगवंताचा आश्रय आहे ते कधीही भयभीत होत नाहीत. त्यांच्या ठिकाणी खरे बल असते. ते नेहमी निश्चिंत व निर्भय असतात. म्हणून आपले कल्याण इच्छिणाऱ्या साधकांनी अधर्म, अन्याय इत्यादींचा सर्वथैव त्याग करून आणि केवळ भगवंताचा आश्रय घेऊन भगवदर्थ आपल्या धर्माचे अनुष्ठान करावे. भौतिक सुखांना महत्त्व देऊन आणि संयोगजन्य सुखाच्या प्रलोभनात फसून कधीही अधर्माचा आश्रय घेऊ नये. कारण या दोहोंनी मानवाचे कधीही कल्याण होत नाही, उलट अकल्याणच होते.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने अस्त्र-शस्त्राने सुसज्जित नारायणी सेनेचा त्याग करून नि:शस्त्र अशा भगवान् श्रीकृष्णाला

* जेव्हा कौरवसैन्यांनी शंख इत्यादी रणवाद्ये वाजविली तेव्हा त्या नादाचा पांडव सैन्यावर काहीही परिणाम झाला नाही. परंतु जेव्हा पांडव सैन्यानी शंखादी रणवाद्ये वाजविली तेव्हा त्या नादाने दुर्योधनादिकांची हृदये विदीर्ण झाली (१।१३-१९) यावरुन सिद्ध होते की, अधर्म, अन्यायाचा पक्ष घेतल्या-कारणाने दुर्योधनादिकांची हृदये कमजोर झाली होती आणि त्यांच्या मनात भयाने वास्तव्य केले होते.

स्वीकार केले होते.* आणि दुर्योधनाने भगवंतांना सोडून त्यांची नारायणी सेना स्वीकार केली होती. तात्पर्य हे आहे की, अर्जुनाची दृष्टी भगवंतावर होती आणि दुर्योधनाची दृष्टी वैभवावर होती. ज्याची दृष्टी भगवंताकडे असते त्याचे अंत:करण बलवान् असते कारण भगवंताचे बल सत्य आहे. परंतु ज्याची दृष्टी सांसारिक वैभवावर असते, त्याचे अंत:करण कमजोर असते, कारण संसाराचे बल कच्चे आहे.

***संबंध—**आता दुर्योधन पितामह भीष्माचार्यांना खुश करण्यासाठी आपल्या सैन्यातील सर्व महारथींना म्हणतो.*

## अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः।
## भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि॥ ११॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **च** | = दुर्योधन बाह्यदृष्टीतून आपल्या सैन्यातील महारथींना म्हणाला— | **सर्वेषु** | = सर्वच | **हि** | = निश्चितरूपाने |
| **भवन्तः** | = आपण | **अयनेषु** | = आखाड्यावर | **भीष्मम्-** | = पितामह- |
| **सर्वे, एव** | = सर्वांनीही | **यथाभागम्** | = आपापल्या जागी | **एव** | भीष्माचार्यांचेच |
| | | **अवस्थिताः** | = दृढतेने स्थिर राहून | **अभिरक्षन्तु** | = सर्व बाजूंनी रक्षण करावे. |

***व्याख्या—**''**अयनेषु च सर्वेषु.....भवन्तः सर्व एव हि**''—ज्या ज्या आखाड्यावर आपली नियुक्ती केली गेली आहे. त्या त्या आखाड्यावर आपण सर्व योध्यांनी दृढपणे स्थिर राहून सर्व बाजूंनी, सर्वप्रकारे भीष्माचार्यांचे रक्षण करावे.

''भीष्माचार्यांचे सर्व बाजूने रक्षण करावे'' असे म्हणून दुर्योधन भीष्माचार्यांना मनातून आपल्या बाजूकडून आणू इच्छितो. असे म्हणण्याचा दुसरा भाव असा आहे की, जेव्हा भीष्माचार्य युद्ध करतील तेव्हा कोणत्याही व्यूह-द्वारातून शिखंडी त्यांच्यासमोर यावयास नको. आपण सर्वांनी या गोष्टीकडे लक्ष द्यावे. जर शिखंडी त्यांच्यासमोर येईल तर भीष्माचार्य त्याच्यावर शस्त्रास्त्र चालवणार नाहीत. कारण शिखंडी पूर्वजन्मातही स्त्री होता आणि याही जन्मामध्ये अगोदर स्त्री होता आणि नतंर पुरुष झाला आहे. म्हणून त्याला भीष्माचार्य स्त्रीच समजतात आणि त्यांनी शिखंडीबरोबर युद्ध न करण्याची प्रतिज्ञा केली आहे. हा शिखंडी श्री शंकराच्या वराने भीष्माचार्यांना मारण्यासाठीच उत्पन्न झाला आहे. म्हणून जर शिखंडीपासून भीष्माचार्यांचे रक्षण झाले तर मग ते सर्वांना मारतील. त्यामुळे आमचा निश्चित विजय होईल. हाच दृष्टीकोन समोर ठेवून दुर्योधन सर्व महारथींना भीष्माचार्यांचे रक्षण करण्यासाठी सांगत आहे.

***संबंध—**द्रोणाचार्य काहीही न बोलल्यामुळे दुर्योधनाचा मानसिक उत्साहभंग झालेला पाहून दुर्योधनाप्रती भीष्माचार्यांनी दाखविलेले प्रेम, जिव्हाळा संजय पुढील श्लोकामधून व्यक्त करतात.*

## तस्य सञ्जनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः।
## सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान्॥ १२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्य** | = त्या (दुर्योधनाच्या) च्या | **कुरुवृद्धः** | = कौरवांतील वृद्ध | **विनद्य** | = गरजून |
| | | **प्रतापवान्** | = प्रभावशाली | **उच्चैः** | = जोराने |
| **हर्षम्** | = (अंत:करणात) हर्ष | **पितामहः** | = पितामह भीष्माचार्यांनी | **शङ्खम्** | = शंख |
| **सञ्जनयन्** | = उत्पन्न करीत | **सिंहनादम्** | = सिंहासारखे | **दध्मौ** | = वाजविला. |

***व्याख्या—* तस्य सञ्जनयन्हर्षम्**—दुर्योधनाच्या मनात हर्ष उत्पन्न होणे हे शंखध्वनीचे कार्य आहे आणि शंखध्वनी कारण आहे. म्हणून येथे शंखध्वनीचे वर्णन अगोदर आणि हर्ष होण्याचे वर्णन नंतर व्हावयास पाहिजे होते. अर्थात् या ठिकाणी ''शंख वाजवून दुर्योधनाला हर्षित केले'' असे म्हणावयास पाहिजे होते. पण असे न म्हणता ''दुर्योधनाला हर्षित करीत भीष्माचार्यांनी शंख वाजविला'' असे म्हटले आहे. असे म्हणून संजय असा भाव प्रगट करीत आहेत की, पितामह भीष्माचार्यांच्या शंखवादन क्रियेने दुर्योधनाच्या मनात हर्ष उत्पन्न होणारच. भीष्माचार्यांच्या या प्रभावाचे द्योतक

* एवमुक्तस्तु कृष्णेन कुन्तीपुत्रो धनञ्जयः। अयुध्यमानं संग्रामे वरयामास केशवम्॥ (महा० उद्योग० ७। २१)

'श्रीकृष्णाने असे म्हटल्यावर कुंतीपुत्र धनंजयाने संग्रामभूमीत (अस्त्र-शस्त्रांनी सुसज्जित एक अक्षौहिणी नारायणी सेनेचा त्याग करून) युद्ध न करणाऱ्या नि:शस्त्र अशा भगवान् श्रीकृष्णांनाच (आपले सहायक) निवडले.'

म्हणूनच संजय त्यांच्यापुढे "**प्रतापवान्**" विशेषण लावतात.

"**कुरुवृद्धः**"—जरी कुरुवंशीयांमध्ये वयाच्या दृष्टीने भीष्माचार्यांपेक्षाही जास्त वयोवृद्ध बाल्हीक होते. [बाल्हीक हे भीष्माचार्यांचे पिता शांतनूचे धाकटे बंधू होते] तरीही कुरुवंशीयांमध्ये जे काही वयोवृद्ध लोक होते त्या सर्वांत भीष्माचार्य धर्माला आणि परमेश्वराला विशेष अर्थाने जाणत होते. म्हणून ज्ञानवृद्ध असल्याने संजय भीष्माचार्यांना "**कुरुवृद्धः**" हे विशेषण लावतात.

"**प्रतापवान्**"—भीष्माचार्यांच्या त्यागाचा फार मोठा प्रभाव होता. त्यांनी कनक-कामिनीचा त्याग केला होता. अर्थात् त्यांनी राज्याचाही स्वीकार केला नाही आणि विवाह-ही केला नाही. भीष्माचार्य शस्त्रास्त्र विद्येमध्ये अत्यंत निपुण होते. तसेच शास्त्रेही उत्तम रीतीने जाणत होते. त्यांच्या ह्या दोन्ही गुणांचाही लोकांवर फार मोठा प्रभाव होता.

जेव्हा एकटे भीष्माचार्य आपल्या बंधूसाठी (विचित्र-वीर्य) काशिनरेशांच्या कन्यांना स्वयंवरातून हरवून आणत होते. तेव्हा स्वयंवरासाठी एकत्र जमलेले सर्व क्षत्रिय त्यांच्यावर तुटून पडले. परंतु एकट्या भीष्माचार्यांनी त्यांना नामोहरम केले. ज्यांच्याकडून भीष्माचार्य शस्त्रास्त्रविद्या शिकले होते. त्या गुरू परशुरामासमोरही त्यांनी आपली हार स्वीकारली नाही. अशा प्रकारे त्यांच्या शस्त्रास्त्रविद्येमधील नैपुण्याचा क्षत्रियांवर मोठा प्रभाव होता.

जेव्हा भीष्माचार्य शरपंजरी पडले होते तेव्हा भगवान् श्रीकृष्णांनी धर्मराजांना म्हटले की, आपल्याला धर्मविषयक काही शंका असतील त्यांचे समाधान भीष्माचार्यांकडून करून घ्यावे. कारण शास्त्रज्ञानाचा "सूर्य" अस्तमानाला जात आहे.* अर्थात् भीष्माचार्य इहलोक सोडून जात आहेत. अशा प्रकारे शास्त्राविषयी त्यांचा दुसऱ्यांवर फार मोठा प्रभाव होता.

**पितामहः**—या पदाचा आशय असा वाटतो की, दुर्योधनाने धूर्तपणाने म्हटलेल्या वचनांना द्रोणाचार्यांनी मुळीच उत्तरे दिली नाहीत. त्यांनी असे ओळखून घेतले की, दुर्योधन धूर्तपणाने मला फसवू पाहत आहे. म्हणून त्यांनी मौन धारण केले. परंतु पितामह (अजोबा) असल्यामुळे भीष्माचार्यांना दुर्योधनाच्या धूर्तपणात त्याचा बालिशपणा (पोरकटपणा) दिसतो. म्हणून भीष्माचार्यांनी द्रोणाचार्याप्रमाणे मौन धारण न करता वात्सल्यामुळे दुर्योधनाला आनंदित करीत शंख वाजविला.

"**सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ**"—ज्याप्रमाणे सिंहाची गर्जना ऐकून हत्तीसारखे मोठमोठे पशू सुद्धा भयभीत होत. अशा प्रकारे गर्जना केल्याने सर्वांनी भयभीत व्हावे आणि दुर्योधनाने खुश व्हावे या भावनेने भीष्माचार्यांनी सिंहाप्रमाणे गर्जना करून जोरात आपला शंख वाजविला.

**परिशिष्ट भाव**—द्रोणाचार्यांचा दुर्योधनाशी विद्येचा संबंध होता आणि भीष्माचार्यांचा जन्माचा अर्थात् कौटुंबिक संबंध होता. जेव्हा विद्येचा संबंध असतो तेव्हा पक्षपात होत नाही, परंतु जेव्हा कौटुंबिक संबंध असतो, तेव्हा स्नेहवश पक्षपात होतो. म्हणून दुर्योधनाद्वारा चलाखीने म्हटले गेलेले वचन ऐकून द्रोणाचार्य गप्प बसले, त्यामुळे दुर्योधनाचा मानसिक उत्साह भंग झाला. परंतु दुर्योधनाला उदास पाहून कौटुंबिक स्नेहामुळे भीष्माचार्य शंख वाजवितात.

***संबंध**—पितामह भीष्माचार्यांनी शंख वाजविल्यामुळे काय परिणाम झाला तो संजय पुढील श्लोकातून सांगतात.*

## ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः।
## सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत्॥ १३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ततः** | = त्यानंतर | **पणवानक** | = ढोल, | | लागली. (त्यांचा) |
| **शङ्खाः** | = शंख | **गोमुखाः** | मृदंग आणि | **सः** | = तो |
| **च** | = आणि | | रणशिंगे वाद्ये | **शब्दः** | = शब्द (नाद) |
| **भेर्यः** | = भेरी (नगारे) | **सहसा, एव** | = एकदमच | **तुमुलः** | = अत्यंत भयंकर |
| **च** | = तसेच | **अभ्यहन्यन्त** | = वाजू | **अभवत्** | = झाला. |

*व्याख्या*—'**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः**'—भीष्माचार्यांनी जरी युद्धारंभाची घोषणा करण्यासाठी शंख वाजविला नव्हता. तर दुर्योधनाला प्रसन्न करण्यासाठीच शंख वाजविला होता. परंतु कौरव सैन्यानी भीष्माचार्यांचे हे शंख वादन म्हणजे युद्ध सुरू झाल्याची घोषणाच समजली. म्हणूनच भीष्माचार्यांनी शंख वाजविल्याबरोबर कौरव सैन्यातील शंखादी रणवाद्ये एकदम वाजू लागली.

**शंख**—शंख समुद्रात उत्पन्न होतात. हे भगवंताच्या

* तस्मिन्नस्तमिते भीष्मे कौरवाणां धुरंधरे।
ज्ञानान्यस्तं गमिष्यन्ति तस्मात् त्वां चोदयाम्यहम्॥ (महाभारत शान्ति० ४६।२३)

पूजेच्या वेळी आरती ओवाळताना उपयोगात आणतात. मंगलकार्य प्रसंगी तसेच युद्धारंभी तोंडाने हवा फुंकून हे वाजविले जातात.

**भेरी**—भेरीला नगारे असे म्हणतात. मोठ्या आकाराच्या नगाऱ्यांना नौबद म्हणतात. हे नगारे लोखंडानी बनविलेले असतात आणि म्हशीच्या कातड्याने मढविलेले असतात. हे लाकडाच्या दांड्यानी वाजविले जातात. हे देवालयात, तसेच राजेलोक आपल्या किल्ल्यांमध्ये ठेवतात. उत्सव आणि मंगलकार्य प्रसंगी हे प्रामुख्याने वाजविले जातात. राजांच्या किल्ल्यांमध्ये हे रोज वाजविले जातात.

**पणव**—पणवाला ढोलके असे म्हणतात. हे लोखंडा-पासून अथवा लाकडापासून बनवितात आणि बकऱ्याच्या कातड्यानी मढवितात. ह्यांना हातांनी किंवा लाकडाच्या दांड्यांनी वाजवितात. हे आकारात ढोलकीप्रमाणेच असून सुद्धा ढोलकीपेक्षा मोठे असतात. कार्यारंभी पणव वाजविणे हे श्रीगणेशाच्या पूजेप्रमाणे शुभ मानले जाते.

**आनक**—आनकाला मृदंग म्हणतात. ह्यांना पख-वाजही म्हणतात. यांचा आकार लाकडापासून बनविलेल्या ढोलक्याप्रमाणेच असतो. हे मातीपासून बनवितात आणि कातड्यांनी मढवितात. आनक हाताने वाजविले जातात.

**गोमुख**—गोमुखाला नरशिंग असे म्हणतात. यांचा आकार सापासारखा नागमोडी वाकडा तिकडा असतो आणि याचे तोंड गायीच्या तोंडासारखे असते. हे तोंडाने हवा फुंकून वाजविले जातात.

**सहसैवाभ्यहन्यन्त**— *कौरवसेनेत अत्यंत उत्साह होता. म्हणून भीष्माचार्यांनी शंख वाजविल्याबरोबर त्यांच्या सैन्यातील सर्व रणवाद्ये एकदमच वाजू लागली. वाद्ये वाजविण्यास उशीर अथवा परिश्रम लागले नाहीत.

**स शब्दस्तुमुलोऽभवत्**—वेगवेगळ्या विभागात आणि तुकड्यामध्ये उभ्या असलेल्या कौरवसैन्याने वाजविलेल्या शंखादी रणवाद्यांचा नाद फार भयंकर झाला. अर्थात् हा आवाज भयंकर मोठ्याने घुमत राहिला.

***संबंध***— *या अध्यायाच्या सुरुवातीलाच धृतराष्ट्राने संजयाला विचारले होते की, ''युद्ध क्षेत्रामध्ये माझ्या आणि पांडूच्या पुत्रांनी काय केले?'' म्हणून संजयाने दुसऱ्या श्लोकापासून तेराव्या श्लोकापर्यंत ''धृतराष्ट्रपुत्रांनी काय केले'' याचे उत्तर दिले. आता पुढील श्लोकापासून संजय ''पांडूच्या पुत्रांनी काय केले?'' ह्या प्रश्नाचे उत्तर देत आहेत.*

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ।**
**माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः॥१४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ततः** | = त्यानंतर | **स्थितौ** | = बसलेल्या | | अर्जुनाने |
| **श्वेतैः** | = शुभ्र, पांढऱ्या | **माधवः** | = लक्ष्मीपती भगवान् श्रीकृष्णाने | **एव** | = सुद्धा |
| **हयैः** | = घोड्यांनी | | | **दिव्यौ** | = दिव्य |
| **युक्ते** | = युक्त असलेल्या | | | **शङ्खौ** | = शंख |
| **महति** | = महान् | **च** | = आणि | **पदध्मतुः** | = अत्यंत जोराने वाजविले. |
| **स्यन्दने** | = रथावर | **पाण्डवः** | = पांडुपुत्र | | |

***व्याख्या*—ततः श्वेतैर्हयैर्युक्ते**—चित्ररथनावाच्या गंधर्वाने अर्जुनाला दिव्य असे शंभर घोडे दिले होते. या घोड्यांचे वैशिष्ट्य असे होते की, यापैकी युद्धामध्ये कितीही घोडे मारले गेले तरी त्यांची संख्या शंभरच राहत होती. ती कमी होत नव्हती. हे घोडे पृथ्वी, स्वर्ग इत्यादी सर्व ठिकाणी जाऊ शकत होते. या शंभर घोड्यापैकी सुंदर आणि चांगले शिकवून तयार केलेले पांढऱ्याशुभ्र रंगाचे चार घोडे अर्जुनाच्या रथाला जुंपलेले होते.

**महति स्यन्दने स्थितौ**—यज्ञामध्ये आहुती म्हणून दिलेल्या तुपाचे भक्षण केल्याने अग्नीला अजीर्ण झाले होते. म्हणून अग्निदेव खांडव वनातील विशेष महत्त्वाच्या औषधी वनस्पती खाऊन (जाळून) आपले अजीर्ण नष्ट करू पाहत होते. परंतु खांडव वनाचे रक्षण देव करीत असल्यामुळे अग्निदेवांना आपली इच्छा पूर्ण करता येईना. ते जेव्हा जेव्हा खांडववन जाळण्याचा प्रयत्न करीत असत तेव्हा तेव्हा इंद्र जलवर्षाव करून अग्नी विझवून टाकीत असत. शेवटी

* कर्माला अत्यंत सुलभतापूर्वक दर्शविण्यासाठी जिथे कर्म इत्यादीलाच कर्ता बनविला जातो त्याला ''कर्मकर्तृ'' प्रयोग म्हणतात. जसे कोणी लाकूड कापत आहे तर या कर्माला सुलभ दर्शविण्यासाठी ''लाकूड कापले जात आहे'' असा प्रयोग केला जातो. तसेच येथे ''वाद्ये वाजविली गेली'' असा प्रयोग व्हावयास पाहिजे. परंतु वाद्ये वाजविण्यात सुलभता दर्शविण्यासाठी, सेनेचा उत्साह दाखविण्यासाठी ''वाद्ये वाजू लागली'' असा प्रयोग केला गेला आहे.

अर्जुनाच्या मदतीने अग्नीने ते खांडववन पूर्णपणे जाळून टाकून आपले अजीर्ण नष्ट केले होते आणि प्रसन्न होऊन अर्जुनाला एक विशाल रथ दिला होता. नऊ बैलगाड्या भरतील इतकी शस्त्रास्त्रे त्या रथात नेहमी पडून राहत असत. हा रथ सोन्याने मढविलेला असून अत्यंत तेज:पुंज होता. त्याची चाके अत्यंत मजबूत आणि विशाल होती. त्यावरील ध्वज विजेप्रमाणे चमकत असे आणि तो एक योजन म्हणजे चार कोसपर्यंत फडकत असे. ध्वज इतका उंच असूनही त्याचे काहीच वजन नव्हते. तो कधीही कोठे वृक्षाला अडकत नसे. या ध्वजावर श्रीहनुमानजी विराजमान झाले होते.

**स्थितौ**—स्थितौ म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, त्या सुंदर आणि तेज:पुंज रथावर साक्षात् भगवान् श्रीकृष्ण आणि त्यांचे आवडते भक्तशिरोमणी अर्जुन विराजमान झाल्यामुळे त्या रथाची शोभा आणि तेज विशेष वाढले होते.

**माधवः पाण्डवश्चैव**—'मा' हे लक्ष्मीचे नाव आहे आणि '**धव**' या शब्दाचा अर्थ पती असा होतो. म्हणून माधव हे नाव लक्ष्मीपतीचे आहे. येथे पांडव हे नाव अर्जुनाचे आहे. कारण अर्जुन सर्व पांडवांमध्ये मुख्य आहेत. **पाण्डवानां धनञ्जयः** (गीता १०।३७)

अर्जुन 'नरा' चे व श्रीकृष्ण 'नारायणा' चे अवतार होते. महाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या आरंभी नराला (अर्जुनाला) आणि नारायणाला (श्रीकृष्णाला) नमस्कार केला गेला आहे-"**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्**" ह्या दृष्टीने पांडव सैन्यामध्ये भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन हे दोघे मुख्य होते. संजयानेही गीतेच्या शेवटी म्हटले आहे की, "ज्या ठिकाणी योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण आणि गांडीव धनुष्य धारण केलेले अर्जुन असतील त्याठिकाणीच लक्ष्मी, विजय ऐश्वर्य आणि अविचल नीती राहील." (गीता १८।७८)

**दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः**—भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या हातात जे शंख होते ते तेज:पुंज आणि अलौकिक होते. ते शंख त्यांनी खूप जोरात वाजविले.

या ठिकाणी अशी शंका येऊ शकते की, कौरवपक्षाचे मुख्य सेनापती पितामह भीष्माचार्य आहेत. म्हणून त्यांनी सर्वात प्रथम शंख वाजविणे योग्यच आहे. परंतु पांडवसैन्यात प्रमुख सेनापती धृष्टद्युम्न असतानाच सारथी झालेले भगवान् श्रीकृष्णानी सर्वात प्रथम शंख का वाजविला? याचे समाधान असे आहे की, भगवान् सारथी असोत की महारथी असोत त्यांची मुख्यता कधीही नाहीशी होऊ शकत नाही. ते कोणत्याही पदावर का असेनात सर्वकाल सर्वाहून श्रेष्ठच असतात. कारण ते अच्युत आहेत. कधीही च्युत होत नाहीत. पांडव सैन्यात भगवान् श्रीकृष्णच प्रमुख होते आणि तेच सर्वांचे संचालन करीत होते. जेव्हा हे बाल्यावस्थेत होते त्यावेळीही नंद आणि उपनंद इत्यादी लोक त्यांचे म्हणणे स्वीकार करीत असत. म्हणूनच तर त्यांनी बालक श्रीकृष्णाच्या म्हणण्यानुसार परंपरागत सुरू असलेली इंद्रपूजा सोडून गोवर्धन पर्वताची पूजा करणे सुरू केले. तात्पर्य हे आहे की, भगवान् कोणत्याही अवस्थेमध्ये, कोणत्याही पदावर आणि कोठेही असले तरी त्याठिकाणी तेच प्रमुख असणार. म्हणूनच पांडवसैन्यामध्ये भगवंतानी सर्वात प्रथम शंख वाजविला.

जो स्वत: कनिष्ठ असतो तोच श्रेष्ठ स्थानावर नियुक्त झाल्यास श्रेष्ठ समजला जातो. म्हणून जो उच्च स्थानावर अधिष्ठित असल्याकारणाने स्वत: ला श्रेष्ठ समजतो तो स्वत: वास्तविक कनिष्ठच असतो. परंतु जो स्वत: श्रेष्ठ असतो तो ज्या ठिकाणी राहत असेल ते स्थान त्या व्यक्तीमुळे श्रेष्ठ समजले जाते. जसे या ठिकाणी भगवंत सारथी बनले आहेत तर त्यांच्यामुळे "सारथी" हे स्थानही श्रेष्ठ झाले.

***संबंध**—आता संजय पुढील चार श्लोकांतून पूर्व श्लोकाचा खुलासा करून दुसऱ्यांच्या शंख वादनाचे वर्णन करतात.*

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः।**
**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः॥ १५॥**

**हृषीकेशः** = अंतर्यामी भगवान् श्रीकृष्णांनी
**पाञ्चजन्यम्** = पांचजन्य नावाचा (तसेच)
**धनञ्जयः** = धनंजय अर्जुनाने
**देवदत्तम्** = देवदत्त नावाचा (शंख वाजविला) आणि
**भीमकर्मा** = भयानक कर्म करणाऱ्या
**वृकोदरः** = वृकोदर भीमाने
**पौण्ड्रम्** = पौण्ड्र नावाचा
**महाशङ्खम्** = महाशंख
**दध्मौ** = वाजविला.

*व्याख्या*—**पाञ्चजन्यं हृषीकेशः**—सर्वांचे अंतर्यामी अर्थात् सर्वांचे अंत:करण जाणणारे भगवान् श्रीकृष्णांनी पांडवांच्या बाजूने उभे राहून 'पांचजन्य' नावाचा शंख वाजविला. भगवंतांनी पांचजन्य नावाच्या शंखरूप धारण करणाऱ्या दैत्याला मारून त्याला शंखरूपाने ग्रहण केले होते म्हणून या शंखाचे नाव पांचजन्य असे पडले.

**देवदत्तं धनञ्जयः**—राजसूय यज्ञाचे वेळी अर्जुनाने असंख्य राजांना जिंकून फार मोठ्या प्रमाणात द्रव्य एकत्र केले होते. म्हणून अर्जुनाचे नाव "धनञ्जय"* पडले. निवातकवचादी दैत्याबरोबर युद्ध करतेवेळी इंद्राने अर्जुनाला "देवदत्त" नावाचा शंख दिला होता. या शंखाचा आवाज फार मोठ्याने होत होता. त्या आवाजाने शत्रूचे सैन्य घाबरून जात होते. अर्जुनाने हा शंख वाजविला.

**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः**— हिडिंबासुर, बकासुर, जटासुर इत्यादी राक्षसांना आणि कीचक, जरासंध इत्यादी बलवान वीरांना ठार मारल्यामुळे भीमाचे नाव "भीमकर्मा" पडले. त्याच्या पोटात जठराग्नि- व्यतिरिक्त "वृक" या नावाचा एक विशेष अग्नी होता. त्यामुळे त्यांना अधिक आहार पचत होता. या कारणाने भीमसेनाचे नाव "वृकोदर" पडले. अशा भयंकर कर्म करणाऱ्या वृकोदर भीमसेनाने प्रचंड आकाराचा पौंड्र नावाचा शंख वाजविला.

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कुन्तीपुत्र** | = कुंतीपुत्र | | (शंख वाजविला तसेच) | **सुघोषमणिपुष्पकौ** | = सुघोष आणि मणिपुष्पक नावाचे (शंख वाजविले). |
| **राजा** | = राजा | **नकुलः** | = नकुल | | |
| **युधिष्ठिरः** | = युधिष्ठिराने | **च** | = आणि | | |
| **अनन्त विजयम्** | = अनंतविजय (नावाचा) | **सहदेव** | = सहदेव यांनी | | |

*व्याख्या*— **अनन्तविजयं राजा.....सुघोष मणि-पुष्पकौ**—युधिष्ठिर, भीम आणि अर्जुन हे तिघे कुन्तीचे पुत्र होते आणि नकुल आणि सहदेव हे दोघे माद्रीचे पुत्र होते. हा फरक दाखविण्यासाठीच याठिकाणी युधिष्ठिराला "कुन्तीपुत्र" म्हणून संबोधले आहे.

युधिष्ठिराला "राजा" म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, वनवासात जाण्यापूर्वी युधिष्ठिर अर्ध्या राज्याचे (इंद्रप्रस्थाचे) राजे होते आणि नियमानुसार बारा वर्ष वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगल्यानंतर ते "राजे" व्हावयास पाहिजे होते. "राजे" विशेषण देऊन "भविष्यकाळात युधिष्ठिर संपूर्ण पृथ्वीचे राजे होणार आहेत" असा संकेतही संजय करू इच्छितात.

**काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते।**
**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पृथिवीपते** | = हे राजन्! | **च** | = आणि | **च** | = तसेच |
| **परमेष्वासः** | = श्रेष्ठ धनुर्धारी | **विराटः** | = राजा विराट | **महाबाहुः** | = विशाल बाहू असणारा |
| **काश्यः** | = काशिराज | **च** | = आणि | **सौभद्रः** | = सुभद्रापुत्र अभिमन्यु (—या सर्वांनी) |
| **च** | = आणि | **अपराजितः** | = अजेय | | |
| **महारथ** | = महारथी | **सात्यकिः** | = सात्यकी, | **सर्वशः** | = सर्व बाजूंनी |
| **शिखण्डी** | = शिखंडी | **द्रुपदः** | = राजा द्रुपद | **पृथक्-पृथक्** | = वेग-वेगळे (आपापले) |
| **च** | = तसेच | **च** | = आणि | **शङ्खान्** | = शंख |
| **धृष्टद्युम्नः** | = धृष्टद्युम्न | **द्रौपदयाः** | = द्रौपदीचे पाच पुत्र | **दध्मुः** | = वाजविले. |

*व्याख्या*— **काश्यश्च परमेष्वासः.........शङ्खान्दध्मुः पृथक्पृथक्**—महारथी शिखण्डी अत्यंत शूरवीर होते. हा पूर्वजन्मात स्त्री (काशिराजाची कन्या अंबा) होता आणि या जन्मातही द्रुपदराजाच्या उदरी कन्यारूपानेच जन्माला आला होता. हाच शिखण्डी नंतर स्थूणाकर्ण नावाच्या यक्षा- कडून पुरुषत्व प्राप्त करून पुरुष झाला. भीष्माचार्य या सर्व घटना

* सर्वाञ्जनपदाञ्जित्वा वित्तमादाय केवलम्। मध्ये धनस्य तिष्ठामि तेनाहुर्मां धनञ्जयम्॥ (महाभारत, विराट० ४४। १३)

जाणत होते आणि शिखण्डीला स्त्रीच समजत होते. याकारणाने ते त्याच्यावर बाण सोडत नव्हते. अर्जुनाने युद्ध प्रसंगी शिखण्डीलाच पुढे करून भीष्माचार्यावर बाण सोडले होते आणि त्यांना रथातून खाली पाडले होते.

अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु हा अत्यंत शूरवीर होता. युद्धाचे वेळी याने द्रोणाचार्यांकडून रचलेल्या चक्रव्यूहामध्ये प्रवेश करून आपल्या पराक्रमाने अपरिमित वीरांना यमसदनास पाठविले होते. शेवटी कौरवसैन्यातील सहा महारर्थीनी त्याला अन्यायपूर्वक घेराव टाकून त्यावर शस्त्रांचा मारा केला. दु:शासनपुत्राकडून डोक्यावर गदेचा प्रहार झाल्याने याचा मृत्यु झाला.

संजयाने शंख वादनाच्या वर्णनात कौरवसैन्यातील शूरवीरांपैकी केवळ भीष्माचार्यांचेच नाव घेतले आणि पांडव सैन्यातील शूरवीरांपैकी भगवान् श्रीकृष्ण, अर्जुन, भीम इत्यादी अठरा वीरांची नावे घेतली. यावरुन असे वाटते की, संजयाच्या मनामध्ये अधर्माच्या पक्षाचा (कौरवसैन्याचा) आदर नाही. म्हणून ते अधर्माच्या पक्षाचे अधिक वर्णन करणे उचित समजत नव्हते. परंतु त्यांच्या मनामध्ये धर्माच्या पक्षाचा (पांडव-सैन्याचा) आदर असल्याने आणि भगवान् श्रीकृष्ण व पांडवा-विषयी आदरभाव असल्याकारणाने ते त्यांच्या पक्षाचेच अधिक वर्णन करणे उचित समजतात आणि त्यांच्या पक्षाचे वर्णन करण्यातच त्यांना आनंद वाटत आहे.

***संबंध***—*पांडवसैन्याच्या शंख वादनाचा कौरवसैन्यावर काय परिणाम झाला हे पुढील श्लोकातून सांगत आहेत.*

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन्॥ १९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **च** | = आणि | **नभः** | = आकाश | **धार्तृराष्ट्राणाम्** | = अन्यायपूर्वक राज्य हडपणाऱ्या दुर्योधन इत्यादीचे |
| **सः** | = (पांडव सैन्याच्या शंखांच्या) त्या | **च** | = आणि | **हृदयानि** | = हृदय |
| **तुमुलः** | = भयंकर | **पृथिवीम्** | = पृथ्वीला | **व्यदारयत्** | = विदीर्ण केले. |
| **घोषः** | = शब्दाने | **एव** | = सुद्धा | | |
| | | **व्यनुनादयन्** | = दणानून सोडत | | |

***व्याख्या***— **स घोषो धार्तराष्ट्राणां..............तुमुलो व्यनुनादयन्**—पांडवसैन्याचे ते शंखवादन इतके तीव्र, भयंकर आणि मोठे होते की, त्या ध्वनि-प्रतिध्वनीने पृथ्वी आणि आकाश व्यापून गेले होते. त्या आवाजाने अन्यायाने राज्य हडप करू इच्छिणाऱ्यांची व त्यांच्या मदतीसाठी आलेल्या (त्यांच्या पक्षाकडून उभे असलेल्या) राजांची हृदये विदीर्ण झाली. तात्पर्य हे आहे की, हृदयाला एखाद्या शस्त्र-अस्त्राने विदीर्ण केल्याने जी पीडा होते तशी पीडा या शंखनादाने झाली. त्या शंखध्वनीने कौरवसैन्याच्या हृदयामध्ये युद्धाचा जो उत्साह होता, बल होते त्याला कमजोर केले आणि त्यामुळे त्यांच्या हृदयात पांडवसैन्याविषयी भय निर्माण झाले.

संजय धृतराष्ट्राला या गोष्टी सांगत आहेत. धृतराष्ट्रापुढे संजयाचे "धृतराष्ट्रांच्या पुत्रांचे आणि त्यांच्या संबंधीयांचे हृदय विदीर्ण झाले" असे म्हणणे शिष्टसंमत आणि युक्तिसंगत वाटत नाही. म्हणून संजयाने "**धार्तराष्ट्राणाम्**" असे न म्हणता "**तावकीनानाम्**" (आपल्या पुत्रांचे आणि संबंधीयांचे) असे म्हणावयास पाहिजे होते. कारण असे म्हणणेच सभ्यपणाचे आहे. यादृष्टीने याठिकाणी "**धार्तराष्ट्राणाम्**" या पदाचा अर्थ ज्यांनी अन्यायपूर्वक राज्य बळकावले. * असा करणेच युक्तिसंगत आणि सभ्यपणाचे वाटते. अन्यायाची बाजू घेतल्यानेच त्यांची हृदये विदीर्ण झाली. यादृष्टीनेही असाच अर्थ लावणे युक्तिसंगत वाटते.

याठिकाणी अशी शंका येते की, कौरवांच्या अकरा अक्षौहिणी † सैन्याने शंखादी वाद्ये वाजविली. त्या शब्दाचा पांडव सैन्यावर काहीही परिणाम झाला नाही. परंतु पांडवांच्या सात

* "अन्यायेन धृतं राष्ट्रं यैस्ते धृतराष्ट्राः" असा बहुव्रीहि समास केल्यानंतर "धृतराष्ट्रा एव" ह्या विग्रहात स्वार्थामध्ये तद्धित चा "अण्" प्रत्यय केला गेला. ज्यामुळे "धार्तराष्ट्राः" असे रूप तयार झाले. याठिकाणी "षष्ठी" च्या विभक्तीची आवश्यकता असल्याने "षष्ठी" मध्ये "धार्तराष्ट्राणाम्" असा प्रयोग केला गेला आहे.

† दुर्योधनाच्या पक्षात अकरा अक्षौहिणी सैन्य असणे शक्यच नव्हते परंतु जेव्हा पांडव वनवासाला गेले तेव्हा दुर्योधनाने धर्मराज युधिष्ठिराच्या राज्य करण्याच्या नीतीचा अवलंब केला. जसे युधिष्ठिरजी आपले कर्तव्य समजून प्रजेला सुख देण्यासाठी धर्म आणि न्यायाने राज्य करीत होते, तसेच दुर्योधनानेही आपले राज्य स्थापन करण्यासाठी, आपला प्रभाव पाडण्याकरिता प्रजेबरोबर युधिष्ठिराप्रमाणेच वर्तन ठेवले. तेरा वर्षपर्यंत अशा प्रकारे राज्य चालविल्यामुळे युद्धाचे वेळी पुष्कळ सैन्य जमा झाले जे पूर्वी पांडवांच्या पक्षात होते आणि पांडवांची अपेक्षा करीत होते. अशा प्रकारे नऊ अक्षौहिणी सेना तर प्रजेसोबत चांगली वागणुक ठेवण्यामुळेच दुर्योधनाच्या पक्षात मिळाली आणि भगवान् श्रीकृष्णाच्या एक अक्षौहिणी नारायणी सेनेला तसेच मद्रराज शल्याच्या एक अक्षौहिणी सेनेला दुर्योधनाने धूर्तपणाने आपल्या बाजूकडे मिळविले जे पांडवांच्या पक्षात होते. म्हणून दुर्योधनाच्या पक्षात अकरा अक्षौहिणी सेना आणि पांडवांच्या पक्षात सात आक्षौहिणी सेना होती.

अक्षौहिणी सैन्याच्या शंख वादनाने कौरव सैन्याचे हृदय का विदीर्ण झाले ? याचे समाधान असे आहे की, ज्यांच्या हृदयांमध्ये अधर्म, पाप, अन्याय नाही अर्थात् जे धर्मानुसार आपल्या कर्तव्याचे पालन करतात त्यांचे हृदय मजबूत असते, त्यांना भय वाटत नाही. न्यायाचा पक्ष असल्याने त्यांच्यात उत्साह असतो, शूरवीरता राहते. पांडवांनी वनवासापूर्वीही न्यायाने आणि धर्मानुसार राज्य केले होते आणि वनवासानंतरसुद्धा नियमानुसार कौरवांकडून राज्याची मागणी केली होती. म्हणून त्यांच्या हृदयात भीती नव्हती. तर उत्साह होता आणि शूरवीरता होती. तात्पर्य हे आहे की, पांडवांचा पक्ष धर्माचा होता. याचकारणाने कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्याने वाजविलेल्या वाद्यांच्या शब्दाने पांडवांच्या सैन्यावर काहीही परिणाम झाला नाही. परंतु जे अधर्म, अन्याय, पाप इत्यादी करतात त्यांचे हृदय सहजच कमजोर असते. त्यांच्या हृदयात निर्भयता, नि:शंकपणा नसतो. त्यांनी स्वत: केलेले पाप व अन्याय हेच त्यांच्या हृदयाला बलहीन करतात. अधर्म अधर्मीला नष्ट करून टाकतो. दुर्योधन इत्यादींनी पांडवांना अन्यायपूर्वक ठार मारण्याचा खूप प्रयत्न केला होता. त्यांनी छळ करून कपटाने व अन्यायाने पांडवांचे राज्य हिरावून घेतले होते आणि त्यांना खूप कष्ट दिले होते. या कारणाने त्यांचे हृदय कमकुवत व निर्बल झाले होते. तात्पर्य, कौरवांचा पक्ष अधर्माचा होता म्हणून पांडवांच्या सात अक्षौहिणी सैन्याच्या शंखध्वनीने त्यांचे हृदय विदीर्ण झाले व त्यांना अत्यंत क्लेश झाले.

ह्या प्रसंगावरुन साधकांनी सावधान व्हावयास पाहिजे की, आपणाकडून आपल्या शरीर, वाणी, मन यांच्याद्वारा कधीही अन्याय आणि अधर्माचे आचरण होऊ देऊ नये. अन्याय आणि अधर्माच्या आचरणाने माणसाचे हृदय कमकुवत व बलहीन होत असते. त्याच्या हृदयात भीती उत्पन्न होते. उदाहरणार्थ लंकेच्या राजाला-रावणाला त्रैलोक्य भीत होते. तोच रावण जेव्हा सीतेचे हरण करण्यासाठी जातो तेव्हा भयभीत होऊन इकडे तिकडे पाहतो.* म्हणून साधकाने कधीही अन्यायाचे आणि अधर्माचे आचरण करू नये.

***संबंध—*** *धृतराष्ट्राने पहिल्या श्लोकात आपल्या व पांडूच्या पुत्रांविषयी प्रश्न विचारला होता. संजयाने दुसऱ्या श्लोकापासून एकोणीसाव्या श्लोकांपर्यंत त्याचे उत्तर दिले. आता भगवद्गीता प्रगट होण्याचा प्रसंग संजय यानंतरच्या श्लोकापासून आरंभ करतात.*

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः।**
**प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्डवः॥२०॥**
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते।**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महीपते** | = हे महीपते धृतराष्ट्र! | | राजे आणि त्यांच्या साथीदारांना | **धनुः** | = (आपले) गांडीव धनुष्य |
| **अथ** | = आता | **व्यवस्थितान्** | = व्यवस्थितरूपाने समोर उभे असलेले | **उद्यम्य** | = उचलले (आणि) |
| **शस्त्र सम्पाते** | = शस्त्र चालविण्याची | **दृष्ट्वा** | = पाहून | **हृषीकेशम्** | = अंतर्यामी भगवान् श्रीकृष्णाला |
| **प्रवृत्ते** | = तयारी होऊच लागली होती की, | **कपिध्वजः** | = कपिध्वज | **इदम्** | = हे |
| **तदा** | = त्यावेळी | **पाण्डवः** | = पांडुपुत्र अर्जुनाने | **वाक्यम्** | = वचन |
| **धार्तराष्ट्रान्** | = अन्यायपूर्वक राज्य धारण करणारे | | | **आह** | = म्हटले. |

***व्याख्या—*** **अथ—**या पदाचे तात्पर्य असे आहे की, आता संजय भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या संवाद-रूपी ''श्रीमद्भगवद्गीतेला'' सुरुवात करतात. अठराव्या अध्यायाच्या चौऱ्याहत्तराव्या श्लोकामध्ये आलेला **'इति'** पदाने हा संवाद समाप्त होतो. तसेच भगवद्गीतेच्या उपदेशाचा आरंभ दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापासून होतो आणि अठराव्या अध्यायाच्या सहासष्टाव्या श्लोकात हा उपदेश समाप्त होतो.

* सून बीच दसकंधर देखा। आवा निकट जती के बेषा॥
जाके डर सुर असुर डेराहीं। निसि न नींद दिन अन्न न खाहीं॥
सो दससीस स्वान की नाईं। इत उत चितइ चला भड़िहाईं॥
इमि कुपंथ पग देत खगेसा। रह न तेज तन, बुधि बल लेसा॥ (मानस ३।२८।४-५)

**प्रवृत्ते शस्त्रसम्पाते**—पितामह भीष्माचार्यांनी युद्धारंभाची घोषणा म्हणून शंख वाजविला नव्हता. तर केवळ दुर्योधनाला प्रसन्न करण्यासाठीच शंख वाजविला होता. तरीही कौरव आणि पांडव सैन्याने ती युद्धारंभाची घोषणाच समजली आणि ते आपापली शस्त्रास्त्रे हातात घेऊन युद्धासाठी सज्ज झाले. अशाप्रकारे युद्धाला सज्ज झालेले सैनिक पाहून अर्जुनाला वीरश्री संचरली आणि त्यानेही आपले गाण्डीव धनुष्य हातात घेतले.

**व्यवस्थितान् धार्तराष्ट्रान् दृष्ट्वा**—या पदातून संजयाचे तात्पर्य असे आहे की, जेव्हा आपल्या दुर्योधनाने पांडवांच्या सेनेला पाहिले तेव्हा तो धावत धावतच द्रोणाचार्यांजवळ गेला. परंतु जेव्हा अर्जुनाने कौरवांच्या सैन्याला पाहिले. तेव्हा त्याचा हात सरळ गाण्डीव धनुष्या-कडेच गेला.

**धनुरुद्यम्य**—या पदाने असे वाटते की, दुर्योधनाच्या अंत:करणात भय आहे आणि अर्जुनाच्या अंत:करणात निर्भयता, उत्साह आणि वीरता आहे.

**कपिध्वजः**—अर्जुनाला ''कपिध्वज'' विशेषण लावून संजय धृतराष्ट्राला अर्जुनाच्या रथाच्या ध्वजावर विराजमान असलेल्या श्रीहनुमंताचे स्मरण करवितात. जेव्हा पांडव वनवासात राहत होते. तेव्हा एके दिवशी अकस्मात वायूने एक दिव्य असे सहस्त्रदळाचे कमळ आणून द्रौपदीसमोर टाकले. ते कमळ पाहून द्रौपदीला फार आनंद झाला आणि ती भीमाला म्हणाली ''हे वीर-श्रेष्ठा मला अशी पुष्कळ कमळे आणून द्या''. द्रौपदीची इच्छा पूर्ण करण्यासाठी भीमसेन तेथून निघाले. जेव्हा ते कदलीवनात गेले. तेव्हा त्यांची हनुमंताशी भेट झाली. त्यांनी आपसात बराच वेळ गप्पागोष्टी केल्या. शेवटी भीमाला काही वर मागण्यासाठी हनुमंतांनी आग्रह धरला. तेव्हा ''माझ्यावर आपली सदैव कृपादृष्टी असू द्यावी'' असे भीमसेन म्हणाले. त्यावर हनुमंत म्हणाले की, ''हे वायुपुत्रा ज्यावेळी तुम्ही बाण आणि शक्ती प्रहारांनी जर्जर झालेल्या शत्रू सैन्यामध्ये घुसून सिंहाप्रमाणे गर्जना कराल, त्यावेळी मीही आपल्या गर्जनेने तुमचा तो सिंहनाद आणखी वर्धित करीन. या व्यतिरिक्त अर्जुनाच्या रथाच्या ध्वजावर बसून मी अशी भयंकर गर्जना करीन की, ज्या गर्जनेने शत्रुसैन्याचे प्राण हरण होतील. अशा दृष्टीने तुम्ही आपल्या शत्रूंना सहज ठार मारू शकाल.''* अशा प्रकारे ज्यांच्या रथाच्या ध्वजावर श्रीहनुमानजी विराजमान झालेले आहेत. त्यांचाच विजय होणार हे निश्चित आहे.

**पाण्डवः**—धृतराष्ट्राने आपल्या प्रश्नामध्ये '**पाण्डवाः**' हे पद वापरले होते म्हणून धृतराष्ट्राला वारंवार पांडवांची आठवण करून देण्यासाठी संजय (१।१४ मध्ये आणि या ठिकाणी) ''**पाण्डवः**'' हे पद वापरतात.

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते**— पांडवसैन्याला पाहून दुर्योधन तर गुरू द्रोणाचार्यांजवळ जाऊन धूर्तपणाची वचने बोलतो. परंतु अर्जुन कौरवसैन्याला पाहून जे जगद्गुरू आहेत, अंतर्यामी आहेत, मन-बुद्धी इत्यादींचे प्रेरक आहेत, अशा भगवान् श्रीकृष्णाला शूरवीरतेने, उत्साहाने आणि कर्तव्याने भरलेले (पुढे सांगितले जाणारे) वचन बोलतात.

*अर्जुन उवाच*

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत॥ २१॥**
**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे॥ २२॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अच्युत** | = हे अच्युत! | **मे** | = माझा | **यावत्** | = जोपर्यंत |
| **उभयोः** | = दोन्ही | **रथम्** | = रथ (आपण) | **अहम्** | = मी (युद्ध क्षेत्रात) |
| **सेनयोः** | = सैन्याच्या | | तोपर्यंत | **अवस्थितान्** | = उभे असलेल्या |
| **मध्ये** | = मध्यभागी | **स्थापय** | = उभा करा, | **एतान्** | = या |

* तदाहं बृंहयिष्यामि स्वरवेण रवं तव।
विजयस्य ध्वजस्थश्च नादान् मोक्ष्यामि दारुणान्॥
शत्रूणां ये प्राणहराः सुखं येन हनिष्यथ। (महाभारत, वन० १५१।१७-१८)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **योद्धु कामान्** | = युद्धाची इच्छा असणाऱ्यांना | **अस्मिन्** | = या | **कैः** | = कोणा-कोणा |
| | | **रणसमुद्यमे** | = युद्धरूप उद्योगात | **सह** | = बरोबर |
| **निरीक्षे** | = पाहून होणार नाही की, | **मया** | = मी | **योद्धव्यम्** | = युद्ध करणेयोग्य आहे. |

*व्याख्या*— **अच्युत सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय**— दोन्हीबाजूकडील सैन्य ज्याठिकाणी युद्ध करण्यासाठी एकमेकांसमोर उभे होते. तेथून ते एकमेकांवर बाणादी-शस्त्रांचा मारा करू शकतील इतके दोन्ही सैन्याचे अंतर होते. त्या दोन्ही सैन्याचा मध्यभाग दोन प्रकाराने होता. (१) सेना जितकी रुंद उभी होती त्या रुंदीचा मध्यभाग. (२) दोन्ही सैन्याचा मध्यभाग, जेथून कौरवसेना जितकी दूर होती तितकीच दूर पांडवसेना उभी होती. अशा मध्यभागी रथ उभा करण्यासाठी अर्जुन भगवंताला म्हणतात. जेणेकरून दोन्ही सैन्याला सहज रीतीने पाहणे शक्य होईल.

**सेनयोरुभयोर्मध्ये**—हे पद गीतेत तीन वेळ आले आहे. येथे (१।२१ मध्ये), याच अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकामध्ये आणि दुसऱ्या अध्यायाच्या दहाव्या श्लोका-मध्ये. तीन वेळ येण्याचे तात्पर्य असे आहे की, पहिल्या वेळी शौर्याने आपला रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी नेऊन उभा करण्याची आज्ञा देतात (१।२१), नंतर भगवान् दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ उभा करून कुरुवंशीयांना पाहण्यासाठी म्हणतात (१।२४) आणि शेवटी दोन्ही सैन्याच्या मध्यभागीच विषादयुक्त अर्जुनाला गीतेचा उपदेश करतात (२।१०). अशा प्रकारे प्रथम अर्जुनात शूरवीरता होती, मध्यंतरी कुटुंबियांना पाहिल्यामुळे मोहाने ते युद्धापासून परावृत्त झाले आणि शेवटी त्यांना भगवंताकडून गीतेचा महान उपदेश प्राप्त झाला. जेणेकरून त्यांचा मोह नष्ट झाला. यावरुन हा भाव निघतो की, मनुष्य कोठेही असो आणि कोणत्याही परिस्थितीत असो. त्याच ठिकाणी राहून तो प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग करून निष्काम होऊ शकतो आणि तेथेच त्याला परमात्म्याची प्राप्ती होऊ शकते. कारण परमात्मा संपूर्ण परिस्थितीमध्ये सर्वकाळ एकरूपाने असतात.

**यावदेतान्निरीक्षेऽहं..........रणसमुद्यमे**—दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ कुठपर्यंत उभा करावा? यावर अर्जुन म्हणतात की, जोपर्यंत मी युद्धाच्या इच्छेने सैन्यासह आलेल्या कौरवसैन्यातील राजेलोकांना पाहू शकत नाही तोपर्यंत आपण रथ तेथेच उभा करावा. या युद्धप्रसंगी मला कोणा-कोणाशी युद्ध करावयाचे आहे? त्यापैकी माझ्या बरोबरीचे सामर्थ्यवान कोण आहेत? माझ्याहून कमी सामर्थ्यवान कोण आहेत? आणि माझ्याहून अधिक बलवान कोण आहेत? त्या सर्वांना मी जरा पाहून घेतो.

या ठिकाणी "**योद्धुकामान्**" पदाने अर्जुन म्हणत आहेत की, आम्ही तर तडजोड करण्याचाच विचार केला होता. परंतु त्यांनी संधीचा स्वीकार केला नाही. कारण त्यांच्या मनामध्ये युद्धाची जास्त इच्छा आहे. म्हणून किती शक्तीने ते युद्ध करण्याची इच्छा करतात ते मी पाहून घेतो.

## योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः।
## धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः॥२३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दुर्बुद्धेः** | = दुष्टबुद्धी | **ये** | = जे | | उतावीळ झालेल्या (या सर्वांना) |
| **धार्तराष्ट्रस्य** | = दुर्योधनाचे | **एते** | = हे राजेलोक | | |
| **युद्धे** | = युद्धात | **अत्र** | = या सैन्यात | | |
| **प्रियचिकीर्षवः** | = प्रिय करण्याची इच्छा असणारे | **समागताः** | = आलेले आहेत, | **अहम्** | = मी |
| | | **योत्स्यमानान्** | = युद्ध करण्यासाठी | **अवेक्षे** | = पाहून घेतो. |

*व्याख्या*— **धार्तराष्ट्रस्य *दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः**— या ठिकाणी दुर्योधनाला दुष्टबुद्धी म्हणून अर्जुन हे म्हणू इच्छितात की, या दुर्योधनाने आमचा नाश करण्यासाठी आजपर्यंत अनेक प्रकारची षड्यंत्रे रचली आहेत. आम्हाला अपमानित करण्यासाठी त्याने कितीतरी उद्योग केले आहेत. नियमानुसार आणि न्यायपूर्वक आम्ही अर्ध्या राज्याचे अधिकारी आहोत. परंतु ते तो स्वतः हडप करू इच्छितो. आम्हाला देऊ इच्छित नाही. अशी तर याची दुष्टबुद्धी आहे

* धार्तराष्ट्र पदाचे दोन अर्थ होतात (१) धृतराष्ट्राचे पुत्र अथवा संबंधी (२) अन्यायपूर्वक राष्ट्रा (राज्य) ला धारण करणारे याठिकाणी धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन त्याच्या करीताच "धार्तराष्ट्रस्य" पद आले आहे.

आणि येथे आलेले राजेलोक युद्धात याला विजय मिळवून देऊ इच्छितात. वास्तविक जर पाहिले तर मित्राचे असे कर्तव्य असते की, त्यांनी असे काम करावे, अशी गोष्ट समजून सांगावी की, ज्यामुळे आपल्या मित्राचे इहलोकात, परलोकात हित व्हावे. परंतु हे राजेलोक दुर्योधनाच्या दुष्टबुद्धीला शुद्ध न करता उलट तिला वाढवू इच्छितात आणि दुर्योधनाकरवी युद्ध करवून, युद्धात त्याची साहाय्यता करून त्याचे पतनच करू इच्छितात. तात्पर्य हे आहे की, दुर्योधनाचे हित कशात आहे; त्याला राज्य सुद्धा कोणत्या पद्धतीने मिळेल आणि त्याचा परलोक सुद्धा कसा सुधारेल. या गोष्टीचा ते विचारच करत नाहीत. जर या राजेलोकांनी त्याला असा सल्ला दिला असता की, बाबा कमीत कमी अर्धे राज्य तुम्ही ठेवून घ्या आणि अर्धे राज्य पांडवांना देऊन टाका. अशा रीतीने दुर्योधनाला अर्धे राज्यही राहिले असते आणि त्याचा परलोकही सुधारला असता.

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः**—या युद्धासाठी उतावीळ असणाऱ्यांना जरा पाहून तर घेतो. यांनी अधर्माचा, अन्यायाचा पक्ष घेतला आहे. म्हणून हे आमच्या पुढे टिकू शकणार नाहीत, नष्ट होतील.

''**योत्स्यमानान्**'' म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, यांच्या मनात युद्ध करण्याची इच्छा प्रबल दिसत आहे तर हे आहेत तरी कोण हे पाहून घेतो.

***संबंध*—*अर्जुनाने असे म्हटल्यावर भगवंतांनी काय केले हे संजय पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत.***

*सञ्जय उवाच*

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्॥ २४॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति॥ २५॥**

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशी राजन्! | **सेनयोः** | = सैन्याच्या | **स्थापयित्वा** | = उभा करून |
| **गुडाकेशेन** | = निद्राविजयी अर्जुनाद्वारा | **मध्ये** | = मध्यभागी | **इति** | = अशाप्रकारे |
| **एवम्** | = अशाप्रकारे | **भीष्मद्रोणप्रमुखतः** | = पितामह भीष्माचार्य आणि द्रोणाचार्यांसमोर | **उवाच** | = म्हटले की, |
| **उक्तः** | = म्हटल्यावर | **च** | = तसेच | **पार्थ** | = 'हे पार्थ! |
| **हृषीकेशः** | = अंतर्यामी भगवान् श्रीकृष्णांनी | **सर्वेषाम्** | = सपूर्ण | **एतान्** | = या |
| **उभयोः** | = दोन्ही | **महीक्षिताम्** | = राजेलोकासमोर | **समवेतान्** | = एकत्र झालेल्या |
| | | **रथोत्तमम्** | = श्रेष्ठ रथ | **कुरून्** | = कुरुवंशीयांना |
| | | | | **पश्य** | = पहा.' |

*व्याख्या*— **गुडाकेशेन**—'**गुडाकेश**'-शब्दाचे दोन अर्थ होतात (१) '**गुडा**' म्हणजे वळलेले आणि '**केश**' म्हणजे डोक्यावरील केस. ज्याच्या डोक्यावरील केस 'कुरळे' आहेत. त्याचे नाव '**गुडाकेश**' आहे (२) '**गुडाका**' असे निद्रेला म्हणतात आणि '**ईश**' म्हणजे 'स्वामी' ज्याने निद्रा जिंकली आहे, असा ज्याचा निद्रेवर अधिकार आहे. मनात आले तेव्हा निद्रा घेऊ शकतो अथवा तिचा त्याग करू शकतो. त्याला '**गुडाकेश**' असे म्हणतात.

**एवमुक्तः**—जो निद्रा, आळसाच्या, सुखाचा गुलाम होत नाही आणि जो विषयभोगांचा दास नाही, केवळ भगवंताचाच दास (भक्त) आहे अशा भक्ताची गोष्ट भगवान् ऐकतात. केवळ ऐकतच नाहीत तर त्याच्या आज्ञेचे पालनही करतात. म्हणून आपल्या भक्त सखा अर्जुनाच्या आज्ञेनुसार अंतर्यामी भगवान् श्रीकृष्णांनी दोन्ही सैन्याच्या मध्यभागी अर्जुनाचा रथ उभा केला.

**हृषीकेशः**—इन्द्रियांचे नाव '**हृषीक**' आहे. जो इन्द्रियांचा ईश अर्थात् स्वामी आहे त्याला 'हृषीकेश' म्हणतात. पूर्वी एकवीसाव्या श्लोकात आणि याठिकाणी '**हृषीकेश**' म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, जे मन, बुद्धी, इन्द्रियादिकांना प्रेरणा करणारे असून, सर्वांना आज्ञा करणारे असून तेच अंतर्यामी भगवान् याठिकाणी अर्जुनाची आज्ञा पालन करणारे बनले आहेत. ही त्यांची अर्जुनावर केवढी

विशेष कृपा आहे.

**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्**—दोन्ही सैन्याच्या मध्यभागी ज्याठिकाणी रिकामी जागा होती. त्या ठिकाणी भगवंतांनी अर्जुनाचा दिव्य रथ उभा केला.

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्**—त्या रथालाही भगवान् श्रीकृष्णाने मोठ्या विलक्षण चातुर्याने अशा ठिकाणी उभे केले की, ज्याठिकाणाहून अर्जुनाला आपल्या कौटुंबिक संबंधी पितामह भीष्माचार्य, विद्यासंबंधी गुरू द्रोणाचार्य आणि कौरवसैन्यातील प्रमुख राजेलोक समोर सहज दिसतील.

**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति**—'कुरु' पदात धृतराष्ट्राचे पुत्र आणि पांडूचे पुत्र हे दोन्ही येतात. कारण हे दोन्ही कुरुवंशी आहेत. युद्धासाठी एकत्र जमलेल्या या कुरुवंशीयांना पहा, असे म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, या कुरुवंशीयांना पाहून अर्जुनाच्या अंत:-करणात असा भाव उत्पन्न व्हावा की, आम्ही सर्व तर एकच आहोत, या पक्षाचे असोत अथवा त्या पक्षाचे असोत, चांगले असोत अथवा वाईट असोत, सदाचारी असोत अथवा दुराचारी असोत. परंतु सर्व आपलेच आप्तेष्ट आहेत. अशा प्रकारे अर्जुनाच्या अंत:करणातील सुप्त कौटुंबिक ममतायुक्त मोह जागृत व्हावा आणि मोह जागृत झाल्यास अर्जुन जिज्ञासू व्हावा. जेणेकरून अर्जुनाला निमित्त करून भविष्यकाळामध्ये कलियुगातील जीवांच्या कल्याणासाठी गीतेचा महान उपदेश दिला जावा. असा भाव ठेवून भगवंतांनी या ठिकाणी "**पश्यैतान् समवेतान् कुरून्**" म्हटले आहे. नाही तर भगवान् "**पश्यैतान् धार्तराष्ट्रान् समानिति**" असेही म्हणू शकत होते. परंतु असे म्हटले असते तर अर्जुनाच्या अंत:करणात युद्धाविषयी आवेश निर्माण झाला असता आणि ज्यामुळे गीतेच्या प्राकट्याला अवसर प्राप्त झाला नसता. तसेच अर्जुनाच्या अंत:करणातील स्वजनाविषयीचा सुप्त मोहही नष्ट झाला नसता. हा मोह नाहीसा करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे असे भगवान् समजत होते. जसे एखाद्याला फोड झाला असता प्रथम वैद्य त्याला पिकवितो आणि पिकल्यानंतर तो कापून साफ करतो. तसेच भगवान् भक्ताच्या अंत:करणातील सुप्त मोहाला प्रथम जागृत करून नंतर त्याला नाहीसे करतात. या ठिकाणीही भगवान् अर्जुनाच्या अंत:करणातील सुप्त मोह "**कुरून् पश्य**" म्हणून जागृत करतात, ज्याला पुढे उपदेश करून नष्ट करतील.

अर्जुनाने म्हटले होते की, "यांना मी पाहून घेतो" "**निरीक्षे**" (१।२२) "**अवेक्षे**" (१।२३) म्हणून येथे भगवंताला "पश्य" (तू पाहून घे) असे म्हणण्याची आवश्यकता नव्हती. भगवंतांनी केवळ रथ उभा करावयास पाहिजे होता. परंतु भगवंतांनी रथ उभा करून अर्जुनाचा मोह जागृत करण्यासाठीच "**कुरून् पश्य**" (या कुरुवंशीयांना पहा) असे म्हटले आहे.

कौटुंबिक प्रीती आणि भगवत्प्रेम या दोन्हीत फार मोठे अंतर आहे. कुटुंबात ममतायुक्त प्रीती असते. त्यामुळे कुटुंबाच्या अवगुणाकडे लक्ष जातच नाही. उलट "हे माझे आहेत" असा भाव असतो. तसेच भगवंताला भक्ताविषयी विशेष प्रीती निर्माण होते. तेव्हा भक्ताच्या अवगुणाकडे भगवंताचे लक्ष जातच नाही. तर "हा माझाच आहे" असाच भाव असतो. कौटुंबिक प्रियतेमध्ये क्रिया तसेच पदार्थां (शरीरादीची) ची आणि भगवत्प्रेमामध्ये भावाची मुख्यता असते. कौटुंबिक प्रियतेमध्ये मूढतेची (मोहाची) आणि भगवत्प्रेमामध्ये आत्मीयतेची मुख्यता असते. कौटुंबिक प्रियतेमध्ये अंधार आणि भगवत्प्रेमामध्ये प्रकाश असतो. कौटुंबिक प्रियतेमध्ये मनुष्य कर्तव्यच्युत होतो आणि भगवत्प्रेमात तल्लीनतेमुळे कर्तव्य पालनाची फार तर विस्मृती होऊ शकते. परंतु भगवद्‌भक्त कधीही कर्तव्यच्युत होऊ शकत नाही. कौटुंबिक प्रियतेमध्ये कुटुंबियांची आणि भगवत्प्रेमामध्ये भगवंताची प्रधानता असते.

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला कुरुवंशीयांना पहा असे म्हटले त्यानंतर काय झाले याचे वर्णन संजय पुढील श्लोकात करीत आहेत.*

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान्।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥**
**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि।**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अथ** | = त्यानंतर | | अर्जुनाने | **उभयोः** | = दोन्हीही |
| **पार्थः** | = पृथानंदन | **तत्र** | = त्या | **एव** | = ही |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **सेनयोः** | = सैन्यामध्ये | **मातुलान्** | = मामांना, | **सखीन्** | = मित्रांना |
| **स्थितान्** | = स्थित असलेल्या | **भ्रातृन्** | = भावांना, | **श्वशुरान्** | = सासऱ्यांना |
| **पितृन्** | = पित्यांना, | **पुत्रान्** | = पुत्रांना, | **च** | = आणि |
| **पितामहान्** | (आजोबांना) | **पौत्रान्** | = नातवांना | **सुहृदः अपि** | = स्नेह्यांनाही |
| **आचार्यान्** | = आचार्यांना, | **तथा** | = तसेच | **अपश्यत्** | = पाहिले. |

***व्याख्या*— तत्रापश्यत्.....सेनयोरुभयोरपि**—जेव्हा भगवंतांनी अर्जुनास म्हटले की, या युद्धभूमीवर एकत्र जमलेल्या कुरुवंशीयांना पहा. तेव्हा अर्जुनाची दृष्टी दोन्ही सैन्यामधील असलेल्या आपल्या कुटुंबियावर पडली. त्यांनी असे पाहिले की, या सैन्यामध्ये युद्धासाठी जमलेले भूरिश्रवा इत्यादी वडिलांचे भाऊ आपापल्या स्थानावर उभे आहेत, जे माझ्यासाठी वडिलासमान आहेत. भीष्माचार्य, सोमदत्त इत्यादी पितामह उभे आहेत. द्रोणाचार्य, कृपाचार्य इत्यादी गुरू (विद्या शिकविणारे आणि कुलगुरू) उभे आहेत. पुरुजित, कुन्तिभोज, शल्य, शकुनी इत्यादी मामा उभे आहेत. भीम, दुर्योधन इत्यादी भाऊ उभे आहेत. अभिमन्यु, घटोत्कच, लक्ष्मण (दुर्योधनाचा पुत्र) इत्यादी माझे आणि माझ्या भावांचे पुत्र उभे आहेत. लक्ष्मण इत्यादींचे पुत्र उभे आहेत, जे माझे पौत्र आहेत. दुर्योधनाचे अश्वत्थामा इत्यादी मित्र उभे आहेत आणि तसेच आपल्या पक्षाचे मित्र देखील उभे आहेत. द्रुपद, शैब्य इत्यादी सासरे उभे आहेत. कोणत्याही हेतुवाचून आपल्या पक्षाचे हित इच्छिणारे सात्यकि, कृतवर्मा इत्यादी स्नेही देखील उभे आहेत.

***संबंध*—*आपल्या सर्व कुटुंबियांना पाहिल्यानंतर अर्जुनाने काय केले हे पुढील श्लोकात सांगत आहेत.***

**तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बन्धूनवस्थितान्॥ २७॥**
**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत्।**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अवस्थितान्** | = आपापल्या जागेवर स्थित असलेल्या | **समीक्ष्य** | = पाहून | **कृपया** | = भीतीने |
| | | **सः** | = ते | **आविष्टः** | = ग्रस्त होऊन |
| **तान्** | = त्या | **कौन्तेयः** | = कुतीनंदन अर्जुन | **विषीदन्** | = विषाद करीत |
| **सर्वान्** | = संपूर्ण | | | **इदम्** | = असे |
| **बन्धून्** | = बाधवांना | **परया** | = अत्यंत | **अब्रवीत** | = म्हणाले. |

***व्याख्या*— तान् सर्वान्बन्धूनवस्थितान् समीक्ष्य**— पूर्वीच्या श्लोकात अर्जुनाने ज्यांना पाहिले त्या व्यतिरिक्त बाल्हीक इत्यादी प्रपितामह, धृष्टद्युम्न, शिखण्डी, सुरथ इत्यादी मेहुणे, जयद्रथ इत्यादी मेहुणे तसेच अन्य कितीतरी आप्तेष्टांना दोन्ही सैन्यामध्ये उभे असलेले पाहिले.

**स कौन्तेयः कृपया परयाविष्टः**—या पदांत **''स कौन्तेयः''** म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, माता कुंतीने ज्यांना युद्ध करण्याचा संदेश दिला होता आणि ''माझ्याशी दोन हात करणारे कोण कोण आहेत?'' असे मुख्य-मुख्य योद्ध्यांना पाहण्यासाठी शूरपणाने म्हणून ज्यांनी भगवान् श्रीकृष्णाला आपला रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी उभा करावयास सांगितले होते तेच अर्जुन अत्यंत भयभीत होतात.

दोन्ही सैन्यामध्ये जन्मापासूनचे आणि गुरुगृहीचे सर्व संबंधीच लोक पाहून अर्जुनाच्या मनात असा विचार आला की, युद्धात या पक्षाचे लोक मरोत की त्या पक्षाचे मरोत नुकसान आमचेच होईल; कुल तर आमचेच नष्ट होईल; आमचेच संबंधी मारले जातील. असा विचार आल्याने अर्जुनाची युद्धाविषयीची इच्छा नाहीशी झाली आणि अंतःकरणात भीती निर्माण झाली. या भीतीलाच भगवंतांनी पुढे (२।२-३ मध्ये) **''कश्मलम्''** तसेच **''हृदयदौर्बल्यम्''** म्हटले आहे आणि अर्जुनाने (२।७ मध्ये) **''कार्पण्यदोषोपहतस्वभावः''** म्हणून त्याचा स्वीकारही केला आहे.

अर्जुन भीतीने ग्रासले गेले आहेत. **''कृपयाविष्टः''** यावरुन सिद्ध होते की, ही भीती पूर्वी नव्हती, तर नवीन निर्माण झाली आहे. म्हणून हा आगंतुक दोष आहे. आगंतुक असल्याकारणाने हा राहणार नाही. परंतु शूरवीरता अर्जुनामध्ये स्वाभाविक आहे. म्हणून ती तर राहणारच.

अत्यंत भीती म्हणजे काय आहे? कोणत्याही कारणावाचून, निंदा, तिरस्कार, अपमान करणारे, दुःख देणारे, वैरभाव ठेवणारे, नाश करण्याचा प्रयत्न करणारे, दुर्योधन, दुःशासन, शकुनी इत्यादींना आपल्यासमोर युद्धाविषयी सज्ज असलेले पाहून सुद्धा त्यांना मारण्याचा विचार न

होणे, त्यांचा नाश करण्याविषयी प्रयत्न न करणे, हा अत्यंत ''भीतिरूप'' दोष आहे. या ठिकाणी अर्जुनाला या दोषाने अशाप्रकारे घेरले आहे की, जे अर्जुनादिकांचे अनिष्ट करू इच्छिणारे आणि वेळोवेळी अनिष्ट करण्याचा प्रयत्न करणारे आहेत; त्या अधर्मी व पापीलोकांविषयी सुद्धा अर्जुनाला करुणा येत आहे (गीता १।३५-४६) आणि ते क्षत्रियाच्या कर्तव्यरूपी आपल्या क्षात्रधर्मापासून परावृत्त होऊ पाहत आहेत.

**विषीदन्निदमब्रवीत्**—युद्धाचा परिणाम म्हणून कुटुंबाची, कुलाची, देशाची कोणती अवस्था होईल या विचाराने अर्जुन अत्यंत दुःखी होत आहेत आणि त्या अवस्थेत ते काय म्हणतात याचे वर्णन पुढील श्लोकात केले आहे.

*अर्जुन उवाच*

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम्॥ २८॥**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते॥ २९॥**
**गाण्डीवं स्त्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः॥ ३०॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृष्ण** | = हे कृष्ण! | **मुखम्** | = मुख | **च** | = आणि |
| **युयुत्सुम्** | = यद्धाची इच्छा असणाऱ्या | **परिशुष्यति** | = कोरडे पडत आहे | **त्वक् एव** | = त्वचेचाही |
| | | **च** | = तसेच | **परिदह्यते** | = दाह होत आहे. |
| **इमम्** | = या | **मे** | = माझ्या | **मे** | = माझे |
| **स्वजनम्** | = कुटुंबसमुदायाला | **शरीरे** | = शरीरात | **मनः** | = मन |
| **समुपस्थितम्** | = आपल्यासमोर उपस्थित असलेले | **वेपथुः** | = कंप (सुटला आहे) | **भ्रमति, इव** | = भ्रमिष्टासारखे होत आहे |
| | | **च** | = आणि | | |
| **दृष्ट्वा** | = पाहून | **रोमहर्षः** | = रोमांच उभे | **च** | = आणि (मी) |
| **मम** | = माझे | **जायते** | = राहत आहेत. | **अवस्थातुम्** | = उभे |
| **गात्राणि** | = अंग | **हस्तात्** | = हातातून | **च ही** | राहण्यातही |
| **सीदन्ति** | = शिथिल होत आहेत | **गाण्डीवम्** | = गांडीव धनुष्य | **न, शक्नोमि** | = असमर्थ होत आहे. |
| **च** | = आणि | **स्त्रंसते** | = गळून पडत आहे | | |

*व्याख्या*—**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम्**—अर्जुनाला ''**कृष्ण**'' नाव फार आवडत होते. हे संबोधन गीतेमध्ये नऊ वेळा आले आहे. भगवान् श्रीकृष्णासाठी दुसरे कोणतेही संबोधन इतक्या वेळेस आले नाही. तसेच भगवंताला अर्जुनाचे ''**पार्थ**'' नाव फार आवडत होते. म्हणून भगवान् आणि अर्जुन एकमेकाला बोलताना हेच नाव घेत असत आणि ही गोष्ट लोकात प्रसिद्धही होती. याच दृष्टीने संजयाने गीतेच्या शेवटी ''**कृष्ण**'' आणि ''**पार्थ**'' या नावाचा उल्लेख केला आहे ''**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः**'' (१८।७८)

धृतराष्ट्राने पूर्वी ''**समवेता युयुत्सवः**'' म्हटले होते आणि येथे अर्जुनानेही ''**युयुत्सुं समुपस्थितम्**'' म्हटले आहे. परंतु दोघांच्या दृष्टीत फार अन्तर आहे. धृतराष्ट्राच्या दृष्टीत तर दुर्योधन इत्यादी माझे पुत्र आहेत आणि युधिष्ठिर इत्यादी पांडूचे पुत्र आहेत—असा भेद आहे. म्हणून धृतराष्ट्राने तेथे ''**मामकाः**'' आणि ''**पाण्डवाः**'' म्हटले आहे. परंतु अर्जुनाच्या दृष्टीत असा भेद नाही. म्हणून अर्जुनाने येथे ''**स्वजनम्**'' म्हटले आहे. ज्यात दोन्ही पक्षाकडील लोक येतात. तात्पर्य हे आहे की, धृतराष्ट्राला तर युद्धात आपल्या पुत्राच्या मरण्याच्या आशंकेचे भय आहे, शोक आहे, परंतु अर्जुनाला दोन्हीकडील कुटुंबियांच्या मरण्याच्या आशंकेने शोक होत आहे की, कोणत्याही पक्षाकडील कोणीही मरो. परंतु तो तर आमचाच कुटुंबीय आहे.

आतापर्यंत ''**दृष्ट्वा**'' हे पद तीन वेळा आले आहे. ''**दृष्ट्वा**

**तु पाण्डवानीकं**" (१।२), "**व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्**" (१।२०) आणि येथे "**दृष्ट्वेमं स्वजनं**" (१।२८) या तीन्हींचे तात्पर्य हे आहे की, दुर्योधनाचे पाहणे एकतर्फी होते अर्थात् दुर्योधनाची तर केवळ युद्धदृष्टीच होती परंतु अर्जुनाचे पाहणे दोन प्रकारचे होते. पूर्वी तर अर्जुन धृतराष्ट्रपुत्रांना पाहून वीरश्रीने युद्ध करण्यासाठी धनुष्य बाण घेऊन उभे राहतात आणि आता स्वजनांना पाहून भीतीने युक्त होत आहेत, युद्धापासून उपरत होत आहेत, त्यांच्या हातातून धनुष्य गळून पडत आहे.

**सीदन्ति मम गात्राणि......भ्रमतीव च मे मनः**— अर्जुनाच्या मनात युद्धामुळे भविष्यकाळात होणाऱ्या परिणामाची चिंता होत आहे, दुःख होत आहे. त्या चिंतेचा, दुःखाचा परिणाम अर्जुनाच्या संपूर्ण शरीरावर घडत आहे. त्या परिणामाविषयी अर्जुन स्पष्ट शब्दात सांगत आहेत की, माझ्या शरीराचे हात, पाय, तोंड इत्यादी एक एक अवयव शिथिल होत आहे, मुख कोरडे पडत आहे. ज्यामुळे बोलणे सुद्धा कठीण जात आहे. संपूर्ण शरीराला थरकाप सुटला आहे. शरीर सर्व रोमांचित होत आहे. ज्या गाण्डीव धनुष्याच्या टंकाराने शत्रू भयभीत होत होते. तेच गाण्डीव धनुष्य माझ्या हातून गळून पडत आहे. सर्व शरीरात दाह होत आहे.* माझे मन भ्रमित होत आहे. अर्थात् माझे काय कर्तव्य आहे ते मला कळेनासे झाले आहे. युद्धभूमीमध्ये रथावर उभे राहण्यासही मी असमर्थ होत आहे. असे वाटते की, मी मूर्च्छित होऊन खाली पडेल. अशा अनर्थकारक युद्धामध्ये उभे राहणे सुद्धा एक पाप वाटत आहे.

*संबंध—पूर्व श्लोकामध्ये आपल्या शरीराच्या शोकजन्य आठ चिन्हांचे वर्णन करून आता अर्जुन भावी परिणामसूचक शकुनांच्या दृष्टीने युद्ध करणे कसे अयोग्य आहे ते सांगतात.*

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव।**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे॥ ३१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **केशव** | = हे केशव! (मी) | **पश्यामि** | = पाहत आहे (आणि) | **श्रेयः** | = कल्याणही |
| **निमित्तानि** | = लक्षणांनाही | **आहवे** | = युद्धात | **च** | (लाभही) |
| **च** | (शकुनांनाही) | **स्वजनम्** | = स्वजनांना | **अनुपश्यामि** | = पाहत |
| **विपरीतानि** | = विपरीत | **हत्वा** | = मारून | **न** | = नाही |

*व्याख्या*—**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव**—हे केशवा! मी शकुनही† विपरीतच पाहत आहे. तात्पर्य हे आहे की, कोणत्याही कार्याच्या सुरवातीला मनात जितका अधिक उत्साह असतो तो त्या कार्याला तितक्याच अधिक प्रमाणात सिद्ध करणारा असतो. परंतु जर कार्याच्या आरंभीच उत्साह भंग झाला, मनात संकल्प-विकल्प योग्य नसले तर त्या कार्याचा परिणामही चांगला होत नाही. याच भावनेने अर्जुन म्हणतात की, यावेळी माझ्या शरीराच्या अवयवांमध्ये शैथिल्य येणे, कंप होणे, मुखाला कोरड पडणे इत्यादी जी लक्षणे दिसत आहेत हे वैयक्तिक शकुनही योग्य दिसत नाहीत.‡ या शिवाय आकाशातून उल्कापात होणे, अवेळी ग्रहण लागणे, भूकंप होणे, पशु-पक्ष्यांनी भयंकर शब्द उच्चारणे, चंद्रावरील काळे डाग मिटल्यासारखे होणे, ढगांमधून रक्ताचा पाऊस पडणे इत्यादी पूर्वीचे जे शकुन झाले तेही योग्य झाले नाहीत. अशाप्रकारे आत्ताचे व पूर्वीचे शकुन पाहिले तर मला हे दोन्हीही शकुन विपरीत अर्थात् भविष्य काळातील अनिष्ट सूचकच दिसत आहेत.

**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे**— युद्धामध्ये आपल्या कुटुंबियांना मारून आम्हाला काही लाभ होईल असेही नाही. या युद्धाच्या परिणामस्वरूपी आम्हाला हा लोक व परलोक हितकारक दिसत नाही. कारण जो आपल्या कुलाचा नाश करतो तो अत्यंत पापी असतो. म्हणून कुलाचा नाश केल्याने आम्हाला पापच लागेल, ज्यामुळे नरकाची प्राप्ती होईल.

---

* चिन्ता चितासमा ह्युक्ता बिन्दुमात्रं विशेषतः। सजीवं दहते चिन्ता निर्जीवं दहते चिता॥
चिन्तेला चितेसमान म्हटले आहे. केवळ एक अनुस्वारच अधिक आहे. चिंता जिवंत माणसाला जाळते आणि चिता मेलेल्याला जाळते.

† जेवढे म्हणून शकुन होतात ते कोणत्याही चांगल्या अथवा वाईट घटनांचे निमित्त नसतात अर्थात् ते कोणत्याही घटनेचे निर्माते नसतात तर भावी घटनेची सूचना देणारे असतात. शकुन दर्शविणारे प्राणीही वास्तविक शकुन दाखवित नाहीत तर त्यांच्या स्वाभाविक क्रिया शकुनदर्शक असतात.

‡ जरी अर्जुन आपल्या शरीरामध्ये निर्माण होणाऱ्या लक्षणांनाही शकुन मानत आहेत तरी ते वास्तविक शकुन नाहीत. हे तर शोकामुळे इन्द्रिये, शरीर, मन आणि बुद्धीमध्ये होणारे विकार आहेत.

ह्या श्लोकामध्ये "**निमित्तानि पश्यामि**" आणि "**श्रेयः अनुपश्यामि**"* या दोन वाक्याने अर्जुन हे सांगू इच्छितात की, शकुनांचा आणि स्वतः चा विचार केला तर मला या दोन्हीही रीतीने युद्धाचा आरंभ आणि त्याचा परिणाम आम्हासाठी आणि संपूर्ण संसारासाठी हितकारक दिसत नाही.

***संबंध***—*ज्यामध्ये शुभ शकुन आणि कल्याणही दिसत नाही अशा अनिष्टकारक विजयाला प्राप्त करण्याची अनिच्छा अर्जुन पुढील श्लोकातून प्रगट करतात.*

## न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च।
## किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा॥ ३२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृष्ण** | = हे कृष्ण! (मला) | **च** | = आणि | **किम्** | = काय लाभ आहे? |
| **विजयम्** | = विजयाची | **सुखानि** | = सुखांचीही (इच्छा) | **भोगैः** | = भोगापासून (काय लाभ आहे?) |
| **काङ्क्षे** | = इच्छा | **न** | = नाही. | **वा** | = अथवा |
| **न** | = नाही (तसेच) | **गोविंद** | = हे गोविंद! | **जीवितेन** | = जगण्यापासून (ही) |
| **राज्यम्** | = राज्याची (इच्छा) | **नः** | = आम्हाला | **किम्** | = काय लाभ आहे? |
| **न** | = नाही | **राज्येन** | = राज्यापासून | | |

*व्याख्या*— **न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च**—असे समजा की, युद्धामध्ये आम्हाला विजय मिळाला तर संपूर्ण पृथ्वीवर आमचेच राज्य आणि अधिकार होईल. पृथ्वीचे राज्य मिळाल्यामुळे आम्हाला अनेक प्रकारची सुखं मिळतील. परंतु त्यांपैकी मला कशाचीच अपेक्षा नाही. अर्थात् माझ्या मनात विजय, राज्य आणि सुखाची कामनाच नाही.

**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा**—जर आमच्या मनात कोणत्याही प्रकारची (विजय, राज्य आणि सुखाची) कामनाच नाही. तर मग केवढेही मोठे राज्य का मिळेना, परंतु त्यापासून आम्हाला काय लाभ आहे? किंवा आपल्या कुटुंबियांना मारून राज्याचे सुख भोगत कितीही वर्षे जगलो तरीही त्यापासून आम्हाला काय लाभ आहे? तात्पर्य हे आहे की, हे विजय, राज्य आणि भोग जर अंतःकरणात याविषयी कामना असेल, प्रियता असेल, महत्त्व असेल तरच सुख देऊ शकतात. परंतु आमच्या अंतःकरणात तर याविषयीची कामनाच नाही. म्हणून हे आम्हाला काय सुख देऊ शकतील? या कुटुंबियांना मारून आमची जगण्याची सुद्धा इच्छा नाही. कारण जर आमचे कुटुंबी मरून जातील तर हे राज्य आणि भोग कोणाच्या कामी येतील? राज्य, भोग इत्यादी तर कुटुंबासाठीच पाहिजे असतात. परंतु तेच जर मरून जातील तर यांचा कोण भोग घेईल? भोगण्याची गोष्ट तर दूरच राहो ते आमच्या अधिक चिंता आणि शोकाला कारण होतील.

***संबंध***—*अर्जुनास विजय इत्यादींची का इच्छा नाही? याचे कारण पुढील श्लोकात सांगतात.*

## येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च।
## त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **येषाम्** | = ज्यांच्या | **सुखानि** | = सुखाची | **प्राणान्** | = प्राणांची |
| **अर्थे** | = साठी | **काङ्क्षितम्** | = इच्छा करीत आहोत, | **च** | = आणि |
| **नः** | = आम्ही | **ते** | = ते (च) | **धनानि** | = धनाची आशा |
| **राज्यम्** | = राज्य, | **इमे** | = हे सर्व (आपल्या) | **त्यक्त्वा** | = सोडून |
| **भोगाः** | = भोग | | | **युद्धे** | = युद्धासाठी |
| **च** | = आणि | | | **अवस्थिताः** | = उभे आहेत. |

* याठिकाणी "पश्यामि" क्रिया भूत आणि वर्तमानकाळातील शकुनाविषयी आणि "अनुपश्यामि" क्रिया भविष्यकाळातील परिणामाविषयी आलेली आहे.

*व्याख्या*— **येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च**—व्यक्तिगत सुखासाठी आम्हाला राज्य, सुख, भोग इत्यादींची इच्छाच नाही तर ह्या कुटुंबियांसाठी, स्नेह्यासाठी, मित्रांसाठी आम्ही हे इच्छित आहोत. आचार्य, पिता, पितामह, पुत्र इत्यादींना सुख-आराम मिळावा, त्यांची सेवा व्हावी, ते प्रसन्न व्हावेत याचसाठी आम्ही युद्ध करून राज्य मिळविण्याची इच्छा करीत आहोत, भोगसामुग्रीचा संग्रह करीत आहोत.

**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च**— परंतु तेच सर्वजण आपल्या प्राणाची आणि धनाची आशा सोडून आमच्यासमोर युद्धभूमीमध्ये उभे आहेत. यांनी असा विचार केला आहे की, आम्हाला प्राणांचा मोह नाही व धनाची लालसा नाही. आम्ही खुशाल मरून जाऊ पण युद्धात मागे हटणार नाही. जर हे सर्वच मरतील तर मग आम्हाला कोणासाठी राज्य पाहिजे ? सुख कोणासाठी हवे ? धन कोणासाठी पाहिजे ? अर्थात् या सर्वांची इच्छा आम्ही कोणासाठी करावी ?

**प्राणांस्त्यक्त्वा धनानि च**—चे तात्पर्य असे आहे की, ते प्राणाची आणि धनाची आशा सोडून उभे आहेत. अर्थात् आम्ही जिवंत राहू आणि आम्हाला धन मिळेल या इच्छेचा त्याग करून ते उभे आहेत. जर त्यांना प्राणाची आणि धनाची इच्छा असती तर ते मरण्यासाठी युद्धात कशाला उभे राहिले असते? म्हणून येथे प्राण आणि धनाचा त्याग करण्याचे तात्पर्य त्यांच्या आशेचा त्याग करण्यातच आहे.

*संबंध—ज्यांच्यासाठी आम्ही राज्य, भोग आणि सुख इच्छित आहोत, ते लोक कोण आहेत, याचे वर्णन अर्जुन पुढील दोन श्लोकांत करतात.*

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः सम्बन्धिनस्तथा॥ ३४॥**
**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन।**
**अपि त्रैलोक्यराजस्य हेतोः किं नु महीकृते॥ ३५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आचार्याः*** | = आचार्य, | **तथा** | = तसेच (इतरहि) हिजे कोणी | **मधुसूदन** | = हे मधुसूदन! (मला) |
| **पितरः** | = पिता, | **सम्बन्धिनः** | = संबंधी आहेत, (त्यांनी माझ्यावर) | **त्रैलोक्यराज्यस्य** | = त्रैलोक्याचे राज्य |
| **पुत्राः** | = पुत्र | **घ्नतः अपि** | = प्रहार केले तरीही (मी) | **हेतोः** | = मिळत असले |
| **च** | = आणि | **एतान्** | = त्यांना | **अपि** | = तरीही (मी त्यांना मारू इच्छित नाही), |
| **तथा, एव** | = त्याचप्रमाणे | **हन्तुम्** | = मारू | **नु** | = मग (मी त्यांना) |
| **पितामहः** | = आजोबा | **इच्छामि** | = इच्छित | **महीकृते** | = पृथ्वीसाठी |
| **मातुलाः** | = मामा, | **न** | = नाही (आणि) | **किम्** | = कशाला (मारू)? |
| **श्वशुराः** | = सासरे, | | | | |
| **पौत्राः** | = नातू, | | | | |
| **श्यालाः** | = मेहुणे | | | | |

*व्याख्या*— [भगवान् पुढे सोळाव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात म्हणतील की, काम, क्रोध आणि लोभ हे तीन नरकाचे दरवाजे आहेत. वास्तविक एका कामाचीच ही तीन रूपे आहेत. हे तिन्ही संसारिक वस्तूंना, व्यक्ती इत्यादींना महत्त्व दिल्यानेच उत्पन्न होतात. काम अर्थात् कामनेची दोन प्रकाराने क्रिया होते. इष्टाची प्राप्ती आणि अनिष्टाची निवृत्ती. यातही इष्टाच्या प्राप्तीचे दोन प्रकार आहेत. संग्रह करणे आणि सुख भोगणे. संग्रहाच्या इच्छेचे नाव "लोभ" आहे आणि सुखभोगाच्या इच्छेचे नाव "काम" आहे. अनिष्टाच्या निवृत्तीत बाधा आली तर "क्रोध" निर्माण होतो अर्थात् भोगाच्या, संग्रहाच्या प्राप्तीमध्ये बाधा देणाऱ्यावर अथवा आमचे अनिष्ट करणाऱ्यावर,

* सव्वीसाव्या श्लोकात "पितॄनथ पितामहान्" म्हणून सर्वप्रथम पिताजींचे आणि पितामहांचे नाव घेतले गेले आहे आणि येथे "आचार्याः पितरः ....." म्हणून सर्वप्रथम आचार्यांचे नाव घेतले गेले आहे. याचे तात्पर्य असे आहे की, तेथे तर कौटुंबिक प्रियतेची मुख्यता आहे. म्हणून तेथे पित्याचे नाव सर्व प्रथम घेतले आहे आणि येथे न मारण्याचा विषय चालू आहे म्हणून येथे सर्व प्रथम आदरणीय पूज्य आचार्यांचे-गुरुजनांचे नाव घेतले आहे की, जे जीवाचे परम हितचिंतक असतात.

आमच्या शरीराचा नाश करणाऱ्यावर "क्रोध" उत्पन्न होतो. ज्यामुळे अनिष्ट करणाऱ्यांचा नाश करण्याची क्रिया होते. यावरुन सिद्ध झाले की, युद्धात मनुष्याची दोन प्रकाराने प्रवृत्ती होते. अनिष्टाच्या निवृत्तीसाठी अर्थात् आपल्या "क्रोधा" ला सफल करण्याकरिता आणि इष्टाच्या प्राप्तीसाठी अर्थात् "लोभा" च्या पूर्तीसाठी! परंतु अर्जुन येथे या दोन्हीही गोष्टींचा निषेध करीत आहेत]

**आचार्याः पितरः ..........किं नु महीकृते**—जर हे आमचे कुटुंबीलोक आपल्या अनिष्ट निवृत्तीसाठी "क्रोधात" येऊन माझ्यावर प्रहार करून माझा वधही करू इच्छितील. तरीही मी आपल्या अनिष्ट निवृत्तीसाठी क्रोधात येऊन यांना मारू इच्छित नाही. जर हे आपल्या इष्ट प्राप्तीसाठी राज्याच्या लोभाने मला मारू इच्छितील, तरीही मी माझ्या इष्ट प्राप्तीसाठी लोभात येऊन यांना मारू इच्छित नाही. तात्पर्य हे निघाले की, क्रोधात आणि लोभात फसून मला नरकात जावयाचे नाही.

या ठिकाणी दोन वेळ "**अपि**" पदाचा प्रयोग करण्यात अर्जुनाचा असा आशय आहे की, मी यांच्या स्वार्थात बाधाच करणार नाही, तर हे मला मारतीलच कशाला ? पण असे समजा की, "पूर्वी याने आमच्या स्वार्थात बाधा आणली आहे" अशा विचाराने हे माझ्या शरीराचा नाश करण्यास प्रवृत्त झाले, तरीही (**घ्नतोऽपि**) मी त्यांना मारू इच्छित नाही. दुसरी गोष्ट, यांना मारल्याने मला त्रैलोक्याचे राज्य मिळत असेल, ही तर अशक्य गोष्ट आहे, पण समजा की, यांना मारल्याने मला त्रैलोक्याचे राज्य मिळणार असेल. तरीही (**अपि त्रैलोक्य राज्यस्य हेतोः**) मी यांना मारू इच्छित नाही.

**मधुसूदन**— * या संबोधनाचे तात्पर्य असे आहे की, आपण तर दैत्याला मारणारे आहात पण हे द्रोणाचार्य भीष्माचार्य दैत्य थोडेच आहेत की, मी त्यांना मारण्याची इच्छा करू ? हे तर आमचे अत्यंत जवळचे महत्त्वाचे नातलग आहेत.

**आचार्याः**—या कुटुंबियांमध्ये ज्या द्रोणाचार्य इत्यादींशी आमचा विद्येचा, हिताचा संबंध आहे. अशा पूज्य आचार्यांची मी सेवा करावी की त्यांच्याशी लढावे ? आचार्यांच्या चरणावर तर आपण-आपल्याला, आपल्या प्राणालाही समर्पित करावयास पाहिजे. हेच आमच्यासाठी उचित आहे.

**पितरः**—शरीराच्या संबंधाने जे पितालोक आहेत, त्यांचेच तर रूप हे आमचे शरीर आहे. शरीराने आम्ही त्यांचे स्वरूप असतांना आम्ही क्रोध किंवा लोभाच्या भरात आपल्या पितृस्वरूप असलेल्यांना कसे मारावे ?

**पुत्राः**—आमचे आणि आमच्या भावाचे जे पुत्र आहेत ते तर सर्वथा पालन करण्यायोग्य आहेत. त्यांनी आमच्या विपरीत जरी कोणतीही क्रिया केली तरीही त्यांचे पालन करणे हाच आमचा धर्म आहे.

**पितामहाः**—तसेच जे पितामह आहेत ते जर आमच्या पिताजींचे पूज्य आहेत तर आमच्यासाठी तर परमपूज्य आहेतच. ते आम्हाला शिक्षा करू शकतात, आम्हाला मारू-ही शकतात. परंतु आमची अशी वागणूक असली पाहिजे की, त्यांना आमच्याकडून यत्किंचितही दुःख होता कामा नये, कष्ट होता कामा नये. तर त्यांना सुख व्हावे, आराम मिळावा, त्यांची सेवा व्हावी.

**मातुलाः**—आमचे जे मामा आहेत ते आमच्या पालन पोषण करणाऱ्या मातांचे भाऊ आहेत. म्हणून मातेप्रमाणेच ते पूज्य वाटावयास पाहिजे.

**श्वशुराः**—हे जे आमचे सासरे आहेत हे माझ्या आणि माझ्या भावाच्या पत्निंचे पूज्य पिताजी आहेत. म्हणून हे आमच्या साठीही पित्या समान आहेत. यांना मी कसे मारू ?

**पौत्राः**—आमच्या पुत्रांचे जे पुत्र आहेत ते तर पुत्रा-पेक्षाही अधिक पालन-पोषण करण्यायोग्य आहेत.

**श्यालाः**—आमचे जे मेहुणे आहेत तेही आमच्या पत्नींचे प्रिय भाऊ आहेत. त्यांनाही कसे मारावे ?

**सम्बन्धिनः**—हे जेवढे संबंधी दिसत आहेत आणि या व्यतिरिक्त जेवढे म्हणून संबंधी आहेत त्यांचे पालन-पोषण, सेवा करावयास पाहिजे की त्यांना मारावे ? यांना मारण्याने जर आम्हाला त्रैलोक्याचे राज्य जरी मिळत असेल तरीही यांना मारणे उचित आहे काय ? यांना मारणे तर सर्वथा अनुचित आहे

***संबंध**—पूर्व श्लोकात अर्जुनाने स्वजनांना न मारण्याचे दोन हेतू सांगितले. आता परिणामाच्या दृष्टीने सुद्धा स्वजनांना न मारणे सिद्ध करतात.*

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन।**
**पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

---

* मधु नावाच्या दैत्याला मारण्यामुळे भगवंताचे नाव "मधुसूदन" पडले होते

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **जनार्दन** | = हे जनार्दन! (या) | **नः** | = आम्हाला | **आततायिनः** | = आततायीयांना |
| **धार्तराष्ट्रान्** | = धृतराष्ट्र-संबंधियांना | **का** | = कोणती | **हत्वा** | = मारण्याने तर |
| **निहत्य** | = मारून | **प्रीतिः** | = प्रसन्नता | **अस्मान्** | = आम्हाला |
| | | **स्यात्** | = होणार आहे? | **पापम् एव** | = पापच |
| | | **एतान्** | = या | **आश्रयेत्** | = लागेल. |

*व्याख्या*— **निहत्य धार्तराष्ट्रान्नः ........ हत्वैतानाततायिनः**—धृतराष्ट्राचे पुत्र व त्यांचे सहयोगी दुसरे जेवढे म्हणून सैनिक आहेत त्यांना मारून विजय मिळविल्याने आम्हाला काय प्रसन्नता होईल? जर आम्ही क्रोध अथवा लोभाच्या आवेगात येऊन यांना जरी मारले. तरी हा आवेग शांत झाल्यावर आम्हाला रडावेच लागेल. अर्थात् क्रोध आणि लोभात फसून आम्ही केवढा अनर्थ करून बसलो. असा पश्चात्तापच करावा लागेल. कुटुंबियांची आठवण झाल्यावर त्यांचा अभाव वारंवार खटकत राहील. अंतः करणात त्यांच्या मृत्युविषयी शोक सतावीत राहील. अशा स्थितीत आम्हाला कधी प्रसन्नता मिळू शकते काय? तात्पर्य हे आहे की, यांना मारल्याने आम्ही या लोकात जोपर्यंत जिवंत राहू तोपर्यंत आमच्या चित्तात कधी प्रसन्नता होणार नाही आणि यांना मारण्याने आम्हाला जे पाप लागेल ते परलोकात आम्हाला भयंकर दुःख देणारे होईल.

**आततायी सहा प्रकारचे असतात**—आग लावणारा, विष देणारा, हातात शस्त्र घेऊन मारण्यास सज्ज झालेला, संपत्ती हरण करणारा, जमीन (राज्य) बळकावणारा आणि स्त्रीचे हरण करणारा.* दुर्योधन इत्यादीमध्ये ही सहाही लक्षणे दिसून येत होती. त्यांनी पांडवांना लाक्षागृहाला आग लावून जाळून मारण्याचा प्रयत्न केला. भीमाला विष घालून नदीत फेकून दिले होते. हातात शस्त्र घेऊन ते पांडवांना मारण्यासाठी तर तयार होतेच. कपटाने द्यूत खेळून त्यांनी पांडवांचे राज्य आणि धनाचे हरण केले होते. द्रौपदीला भर सभेत ओढत आणून "तुला आम्ही जिंकले आहे, तू आमची दासी झाली आहेस" असे म्हणून तिचा अपमान केला होता आणि दुर्योधनादिकांच्या प्रेरणेने जयद्रथाने द्रौपदीला हरण करून नेले होते.

शास्त्रवचनानुसार आततायीला मारल्याने मारणाऱ्यास काहीही दोष (पाप) लागत नाही "**नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन**" (मनुस्मृति ८।३५१) परंतु आततायीला मारणे उचित असून सुद्धा मारण्याची क्रिया चांगली नाही. शास्त्र सुद्धा असे सांगते की, मनुष्याने केव्हाही कोणाचीही हिंसा करू नये "**न हिंस्यात्सर्वा भूतानि**" हिंसा न करणे परम धर्म आहे-"**अहिंसा परमो धर्मः**" † म्हणून क्रोध-लोभाला वश होऊन कुटुंबियांच्या हिंसेचे कार्य आम्ही कशाला करावे?

आततायी असल्यामुळे हे दुर्योधनादी मारण्याच्या लायक आहेतच. परंतु आपले कुटुंबी असल्याने यांना मारल्याने आम्हाला पापच लागेल. कारण शास्त्रात असे वर्णन आहे की, जो आपल्या कुलाचा नाश करतो तो अत्यंत पापी असतो. "**स एव पापिष्ठतमो यः कुर्यात्कुलनाशनम्**" म्हणून जो आततायी आपला विशेष कुटुंबी आहे त्याला कसे मारावे? त्यांच्यापासून आपला संबंध तोडून टाकणे, त्यांच्यापासून आपण वेगळे होणे हे योग्य आहे. पण त्यांना मारणे योग्य नाही. जसे आपला मुलगाच जर आततायी झाला तर त्याच्यापासून आपला संबंध आपण सोडू शकतो पण त्याला ठार थोडेच केले जाऊ शकते?

***संबंध***—*पूर्व श्लोकात युद्धाचा दुष्परिणाम दाखवून आता अर्जुन युद्ध करणे संपूर्णपणे कसे अनुचित आहे हे सांगतात.*

## तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान्।
## स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव॥ ३७॥

---

* अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः। क्षेत्रदारापहर्ता च षडेते ह्याततायिनः॥ (वसिष्ठस्मृति ३।१९)

अग्नी लावणारा, विष देणारा, हातात शस्त्र घेऊन मारण्यासाठी आतुर झालेला, द्रव्य हरण करणारा, जमीन (राज्य) बळकावणारा आणि स्त्रीचे हरण करणारा. हे सहाही आततायी आहेत.

† "आततायींना ठार करा" हे अर्थशास्त्र आहे आणि "कोणाची हिंसा करू नये" हे धर्मशास्त्र आहे. ज्यामध्ये आपला काहीतरी स्वार्थ असतो त्याला "अर्थशास्त्र" म्हणतात आणि ज्यामध्ये आपला कोणताही स्वार्थ नसतो त्याला "धर्मशास्त्र" म्हणतात. अर्थशास्त्रापेक्षा धर्मशास्त्र बलवान असते. म्हणून शास्त्रामध्ये ज्याठिकाणी अर्थशास्त्र आणि धर्मशास्त्र यामध्ये विरोध आला तर अर्थशास्त्राचा त्याग करून धर्मशास्त्रच ग्राह्य मानले पाहिजे.

स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः। अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः॥ (याज्ञवल्क्यस्मृति २।२१)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | **हन्तुम** | = मारण्यासाठी | **स्वजनम्** | = आपल्या कुटुंबियांना |
| **स्वबान्धवान्** | = आपले बांधव (या) | **वयम्** | = आम्ही | **हत्वा** | = मारून (आम्ही) |
| | | **न, अहो:** | = योग्य नाही; | **कथम्** | = कसे |
| **धार्तराष्ट्रान्** | = धृतराष्ट्र-संबंधियांना | **हि** | = कारण | **सुखिनः** | = सुखी |
| | | **माधव** | = हे माधव! | **स्याम** | = होऊ? |

*व्याख्या*— **तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान्**—आत्तापर्यंत (१।२८ पासून येथपर्यत) कुटुंबियांना न मारण्याविषयी जो काही युक्तिवाद केला आहे, प्रमाणे दिली आहेत आणि विचार मी प्रगट केला आहे त्यांना अनुसरून आम्ही अशा प्रकारचे अनर्थकारक कर्म करण्यासाठी कसे बरे प्रवृत्त होऊ शकतो? आपलेच बांधव असलेल्या या धृतराष्ट्र-संबंधींना मारणे सर्वथैव अयोग्य, अनुचित आहे. आमच्यासारखे चांगले पुरुष असे अनुचित कार्य कसे करू शकतील?

**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव**—हे माधवा, ह्या कुटुंबियांच्या मरण्याच्या कल्पनेनेच अत्यंत दुःख होत आहे, संताप होत आहे तर मग क्रोध आणि लोभाच्या भरात आम्ही जर त्यांना मारू तर आम्हाला किती दुःख होईल, त्यांना मारून आम्ही कसे सुखी होऊ?

या ठिकाणी "हे आमचे घनिष्ठ संबंधी आहेत" या ममताजन्य मोहामुळे आपल्या क्षत्रियोचित कर्तव्याकडे अर्जुनाने पाठ फिरविली आहे. कारण जेव्हा मोह होतो तेव्हा मनुष्याचा विवेक दबला जातो. विवेक दबल्याने मोहाचे प्राबल्य वाढते. मोह प्रबल झाला की, आपल्या कर्तव्याचे स्पष्ट भान राहत नाही.

***संबंध**—आता याठिकाणी अशी शंका येते की, जसे तुमच्यासाठी दुर्योधन इत्यादी स्वजन आहेत तसेच दुर्योधन इत्यादीसाठी तर तुम्ही स्वजन आहात. स्वजनांच्या दृष्टीने तुम्ही तर युद्धापासून निवृत्त होण्याचा विचार करीत आहात. परंतु दुर्योधनादी युद्धापासून परावृत्त होण्याचा विचार करीत नाहीत. याचे काय कारण आहे? याचे उत्तर अर्जुन पुढील दोन श्लोकांत देत आहेत.*

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम्॥ ३८॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम्।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन॥ ३९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यद्यपि** | = जरी | **मित्रद्रोहे** | = मित्राशी द्वेष केल्याने होणारे | **प्रपश्यद्भिः** | = चांगल्या प्रकारे जाणणारे |
| **लोभोपहत-चेतसः** | = लोभामुळे ज्यांचा विवेक-विचार नष्ट झाला आहे, अशा | **पातकम्** | = पाप | **अस्माभिः** | = आम्ही |
| | | **पश्यन्ति** | = दिसत | **अस्मात्** | = या |
| **एते** | = या (दुर्योधनादिकांना) | **न** | = नाही (तरीही) | **पापात्** | = पापापासून |
| **कुलक्षय कृतम्** | = कुलाचा नाश केल्याने होणारे | **जनार्दन** | = हे जनार्दन! | **निवर्तितुम्** | = निवृत्त होण्याचा |
| | | **कुलक्षयकृतम्** | = कुलाचा नाश केल्याने होणारे | **ज्ञेयम्** | = विचार |
| **दोषम्** | = दोष | | | **कथम्** | = का |
| **च** | = आणि | **दोषम्** | = दोष | **न** | = करू नये? |

*व्याख्या*— **यद्यप्येते न पश्यन्ति.........मित्रद्रोहे च पातकम्**—इतके मिळाले, इतके आणखी मिळो, पुढे असेच मिळत रहावे. अशाप्रकारे धन, जमीन, घर, आदर, प्रशंसा, पद, अधिकार इत्यादीकडे वाढत चाललेल्या मनुष्याच्या वृत्तीला "लोभ" असे म्हणतात. या लोभ-वृत्तीच्या कारणाने या दुर्योधनादिकांची विवेक-शक्ती नाहीशी झाली आहे. ज्यामुळे त्यांच्या मनात असा विचार येत नाही की, ज्या राज्यासाठी आम्ही एवढे मोठे पाप करीत आहोत, कुटुंबियांना नष्ट करू पाहत आहोत ते राज्य आमच्याजवळ किती दिवस राहील आणि आम्ही त्याच्याबरोबर किती दिवस राहू? आम्ही जिवंत असतांना हे राज्य गेले तर आमची कशी दुर्दशा होईल आणि राज्य असतांना जर आम्ही मेलो तर राज्याची

कशी अवस्था होईल ? कारण मनुष्य संयोगापासून जेवढे सुख घेतो त्याच्या वियोगापासून तितके दु:ख त्याला भोगावेच लागते. संयोगात एवढे सुख मिळत नाही जेवढे वियोगामध्ये दु:ख होते. तात्पर्य हे आहे की, अंत:करण लोभाने व्याप्त झाल्याकारणाने यांना सर्वत्र राज्यच-राज्य दिसत आहे. कुळाचा नाश केल्याने केवढे भयंकर पाप लागेल इकडे त्यांची दृष्टीच नाही.

ज्या ठिकाणी लढाई होते तेथे समय, शक्ती आणि संपत्ती यांचा नाश होतो. अनेक प्रकारच्या चिंता आणि संकटे येतात. दोन मित्रांमध्येही भांडणे होतात. मनोमालिन्य होते. अनेक प्रकारचे मतभेद निर्माण होतात. मतभेद झाल्याने वैरभाव निर्माण होतो. जसे द्रुपदराजा आणि द्रोणाचार्य हे दोन्ही लहानपणी मित्र होते. परंतु राज्यप्राप्ती नंतर द्रुपदराजाने एके दिवशी द्रोणाचार्यांचा अपमान करून दोघांमधील मैत्रीला ठोकर मारली होती. याकारणाने द्रुपदराजा आणि द्रोणाचार्य यांच्या दरम्यान वैरभाव निर्माण झाला. आपल्या अपमानाचा बदला घेण्यासाठी द्रोणाचार्यांनी माझ्याकरवी द्रुपदराजाला परास्त करून त्याचे अर्धे राज्य घेतले. या कारणाने द्रुपदराजाने द्रोणाचार्यांचा नाश करण्यासाठी एक यज्ञ करविला. त्यापासून धृष्टद्युम्न आणि द्रौपदी उत्पन्न झाले. अशाप्रकारे मित्राबरोबर वैरभाव ठेवल्यास केवढे भयंकर पाप लागेल याकडे त्यांचे लक्षच नाही.

## विशेष गोष्ट

आता आमच्याजवळ ज्या वस्तूंचा अभाव आहे त्या वस्तुवाचूनही आमचे काम भागत आहे, आम्ही चांगल्या प्रकारे जीवन जगत आहोत. परंतु जेव्हा त्या वस्तू आम्हाला मिळाल्यानंतर पुन: नष्ट होतात. तेव्हा त्यांच्या अभावाचे फार भयंकर दु:ख होते. तात्पर्य, प्रथम वस्तूंचा जो निरंतर अभाव होता. तो इतका दु:खदायी नव्हता जितका वस्तूंचा संयोग होऊन पुन: त्यांचा वियोग होणे दु:खदायी आहे. असे असताना सुद्धा मनुष्य ज्या वस्तूंचा आपल्याजवळ अभाव मानतो त्या वस्तूंना तो लोभाने मिळविण्याचा प्रयत्न करतो. विचार केल्यास असे अनुभवाला येते की, ज्या वस्तूंचा आता अभाव आहे, मध्यंतरी प्रारब्धानुसार त्यांची प्राप्ती झाली. तरीही शेवटी त्यांचा अभावच राहील. म्हणून आमची तर तीच अवस्था राहिली. जी वस्तू मिळण्यापूर्वी होती. मध्यंतरी लोभामुळे त्या वस्तू मिळविण्यासाठी परिश्रमच परिश्रम करावे लागले, दु:खच-दु:ख भोगावे लागले. मध्यंतरी वस्तूंच्या संयोगाने जे थोडेसे सुख झाले. ते तर केवळ लोभामुळेच झाले. जर अंत:करणात लोभ-रूपी दोष नसेल तर वस्तूंच्या संयोगाने सुख होणारच नाही. तसेच मोहरूपी दोष नसेल तर कुटुंबियांपासून सुख होऊच शकत नाही. लालुच दोष नसेल तर संग्रहाचे सुख होऊच शकत नाही. तात्पर्य, संसाराचे सुख कोणत्या ना कोणत्या दोषामुळेच होते. कोणताच दोष नसेल तर संसारापासून सुख होऊच शकत नाही. परंतु लोभामुळे मनुष्य असा विचार करू शकत नाही. हा लोभ त्याच्या विवेक-विचाराला नष्ट करून टाकतो.

**कथं न ज्ञेयमस्माभिः............प्रपश्यद्भिर्जनार्दन—** आता अर्जुन आपले मत व्यक्त करतात की, जरी दुर्योधनादि-कांची आपल्या कुलक्षयामुळे होणाऱ्या दोषाकडे आणि मित्र-द्रोहामुळे होणाऱ्या पापाकडे दृष्टी नाही, तरीपण आम्हाला कुलक्षयामुळे होणाऱ्या अनर्थ परंपरेला पाहिलेच पाहिजे. [ज्याचे वर्णन अर्जुन पुढे चाळीसाव्या श्लोकांपासून चौवे-चाळीसाव्या श्लोकापर्यंत करतील]. कारण कुलक्षयामुळे होणारे दोष आम्ही चांगल्या तऱ्हेने जाणतो आणि मित्राशी द्रोह (वैर-द्वेष) केल्यास होणारे पापही उत्तम रीतीने जाणतो. जर त्या मित्रांनी आम्हाला दु:ख दिले तर ते दु:ख आमच्यासाठी अनिष्टकारक नाही. कारण दु:खाने तर आमच्या पूर्व पापांचा नाश होईल. आमची शुद्धीच होईल. परंतु आमच्या मनात जर द्रोह-वैरभाव असेल. तर तो मेल्या-नंतरही आमच्या बरोबर राहील आणि प्रत्येक जन्मामध्ये आम्हाला पाप करण्याविषयी प्रेरणा देत राहील. ज्यामुळे आमचे पतनच-पतन होईल. अशा अनर्थ करणाऱ्या आणि मित्रासोबत द्रोह निर्माण करणाऱ्या या युद्धरूपी पापापासून वाचण्याचा विचार का करू नये ? अर्थात् विचार करून या पापापासून आम्ही स्वत:ला अवश्य वाचवलेच पाहिजे.

याठिकाणी अर्जुनाची दृष्टी दुर्योधनादिकांच्या लोभाकडे तर जात आहे. पण ते स्वत: कौटुंबिक मोहामध्ये गुरफटले जाऊन बोलत आहेत. इकडे त्यांची दृष्टी जात नाही. या कारणानेच ते आपल्या कर्तव्याला समजत नाहीत. असा नियम आहे की, जोपर्यंत मनुष्याची दृष्टी दुसऱ्याच्या दोषाकडे असते तोपर्यंत त्याला आपला दोष दिसत नाही. उलट असा एक अभिमान होतो की, यांच्यात तर हा दोष आहे, परंतु आमच्यात हा दोष नाही. अशा अवस्थेत तो विचारच करू शकत नाही की, जर यांच्यात कोणता दोष आहे; तर आमच्यातही दुसरा कोणता दोष असू शकतो. समजा दुसरा दोष जरी नसला तरी दुसऱ्याचा दोष पाहणे हा दोष तर आहेच. दुसऱ्याचा दोष पाहणे तसेच आपल्यात चांगुल-पणाचा अभिमान होणे हे दोन्ही दोष एकमेका सोबतच

राहतात. अर्जुनालाही दुर्योधनादिकांमध्ये दोष दिसत आहे आणि आपल्यात चांगुलपणाचा अभिमान होत आहे. (चांगुलपणाच्या अभिमानरूपी सावलीत सर्व दोष राहतात) म्हणून त्यांना आपल्यातील मोहरूपी दोष दिसत नाही.

*संबंध—कुलक्षय झाल्यास होणाऱ्या ज्या दोषांना आम्ही जाणतो ते दोष कोणते आहेत? त्या दोषांची परंपरा पुढील पाच श्लोकांत सांगत आहेत.*

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत॥ ४०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कुलक्षये** | = कुलाचा नाश झाल्याने | **उत** | = आणि | **कृत्स्नम्** | = संपूर्ण |
| **सनातनाः** | = निरंतर चालत आलेले | **धर्मे** | = धर्माचा | **कुलम्** | = कुलाला |
| **कुलधर्माः** | = कुलधर्म | **नष्टे** | = नाश झाल्याने (उरलेल्या) | **अधर्मः** | = अधर्म |
| **प्रणश्यन्ति** | = नष्ट होतात | | | **अभिभवति** | = दाबून टाकतो. |

*व्याख्या—* **कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः**—जेव्हा युद्ध होते तेव्हा त्यात कुळाचा (वंशाचा) क्षय (ह्रास) होतो. जेव्हापासून कुळाचा आरंभ झाला आहे. तेव्हापासून कुळाचे धर्म अर्थात् कुळाच्या पवित्र परंपरा, पवित्र रीतिरिवाज, मर्यादा देखील परंपरेने चालतात. परंतु जेव्हा कुळाचा नाश होतो. तेव्हा निरंतर कुळासोबत राहणारे धर्म देखील नष्ट होतात. अर्थात् जन्मसमयी, मौंजीबंधनाच्यावेळी, विवाहप्रसंगी, मृत्युसमयी आणि मृत्युनंतर करण्यात येणारे जे शास्त्रोक्त पवित्र रीतिरिवाज आहेत जे जीवित असताना आणि मृत्युनंतर अर्थात् इहलोकी आणि परलोकी मनुष्याचे कल्याण करणारे आहेत. ते सर्व नष्ट होतात. कारण की, जेव्हा कुलाचाच नाश होतो तेव्हा कुलाच्या आश्रयाने राहणारे धर्म कोणाच्या आश्रयाने राहतील?

**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत**—जेव्हा कुलाच्या पवित्र मर्यादा, पवित्र आचरण नष्ट होतात तेव्हा धर्माचे पालन न करणे आणि धर्मविरोधी कर्म करणे अर्थात् करण्यालायक काम न करणे आणि न करण्यायोग्य काम करणे ह्या रूपाने अधर्म संपूर्ण कुळाला दडपून टाकतो. अर्थात् संपूर्ण कुळावर अधर्माची छाया पसरते.

आता याठिकाणी अशी शंका येते की, जर कुळ नष्ट होईल, कुळ राहणारच नाही तर अधर्म कोणाला दडपून टाकील? याचे उत्तर असे आहे की, जे लढाई करण्याला योग्य पुरुष आहेत. ते तर युद्धात मारले जातील. पण जे लढाईसाठी योग्य नाहीत असे जे बालक आणि स्त्रीया मागे राहतात. त्यांना अधर्म दडपून टाकतो. कारण की, जेव्हा युद्धात शस्त्र-शास्त्र-व्यवहार इत्यादींचे जाणकार आणि अनुभवी पुरुष मरतात, तेव्हा मागे उरलेल्या लोकांना उत्तम प्रकारचे शिक्षण देणारे, त्यांच्यावर शासन करणारे कोणीही राहत नाही. अशा स्थितीत मर्यादेचे आणि व्यवहाराचे ज्ञान नसल्याने ते मनाला वाटेल तसे आचरण करू लागतात. अर्थात् ते करण्यायोग्य कर्म न करता न करण्यालायक काम करू लागतात. म्हणून त्यांच्यात अधर्म पसरतो.

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः॥ ४१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृष्ण** | = हे कृष्ण! | **कुलस्त्रियः** | = कुलस्त्रीया | **स्त्रीषु** | = स्त्रीया |
| **अधर्माभिभवात्** | = अधर्माची अधिक वृद्धी झाल्याने | **प्रदुष्यन्ति** | = दूषित होतात (आणि) | **दुष्टासु** | = दूषित झाल्यास |
| | | | | **वर्णसङ्कर** | = वर्णसंकर |
| | | **वार्ष्णेय** | = हे वार्ष्णेय! | **जायते** | = उत्पन्न होतात. |

*व्याख्या—* **अधर्माभिभवात्कृष्ण.............प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः**—धर्माचे पालन केल्याने अंतः करण शुद्ध होते. अंतःकरण शुद्ध झाल्यास बुद्धी सात्त्विक बनते. सात्त्विक बुद्धीत ''काय करावे आणि काय करू नये'' याचा विवेक जागृत राहतो. परंतु कुळात जेव्हा अधर्म वाढतो तेव्हा आचरण अशुद्ध होऊ लागते. ज्यामुळे अंतः करण अशुद्ध होते. अंतः-करण अशुद्ध बनल्याने बुद्धी तामसी होते. बुद्धी तामसी झाली की मनुष्य अकर्तव्याला कर्तव्य आणि कर्तव्याला अकर्तव्य समजू लागतो. अर्थात् त्याच्यात शास्त्र मर्यादेच्या विरुद्ध विचार निर्माण होतात. अशा विपरीत बुद्धीने कुलस्त्रिया दूषित होतात.

अर्थात् व्यभिचारिणी होतात.

**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः**—स्त्रीया दूषित झाल्यास वर्णसंकर* उत्पन्न होतो. पुरुष आणि स्त्री हे दोन्ही जर निरनिराळ्या वर्णाचे असतील तर त्यापासून जी संतान उत्पन्न होते ती ''वर्णसंकर'' म्हटली जाते.

अर्जुन येथे ''**कृष्ण**'' संबोधन देऊन म्हणत आहेत की, आपण सर्वांना आकर्षित करणारे असल्याने ''**कृष्ण**'' म्हणविले जाता. तर मग आपणच सांगा की आमच्या कुळाला आपण कोणत्या बाजूस खेचाल. अर्थात् कोणीकडे न्याल?

**वार्ष्णेय**—हे संबोधन देण्याचा भाव असा आहे की, आपण वृष्णीवंशात अवतार धारण केल्याने ''**वार्ष्णेय**'' म्हणविले जाता. परंतु जर आमच्या कुळाचा (वंशाचा) नाश होईल तर आमचे वंशज कोण्या कुळाचे म्हणविले जातील? म्हणून कुळाचा नाश करणे योग्य नाही.

**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सङ्करः** | = वर्णसंकर | **नरकाय एव** | = नरकात घेऊन जाणाराच होतो. | **एषाम्** | = यांच्या (कुलघातक्यांच्या) |
| **कुलघ्नानाम्** | = कुलघातक्यांना | | | **पितरः हि** | = पितरांचे सुद्धा (आपल्या स्थानापासून) |
| **च** | = आणि | **लुप्त पिण्डो-** | = श्राद्ध आणि | | |
| **कुलस्य** | = कुलांना | **दकक्रियाः** | तर्पण न मिळाल्याने | **पतन्ति** | = पतन होते. |

*व्याख्या*— **सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च**—वर्ण-मिश्रणाने उत्पन्न झालेल्या वर्णसंकरात (सन्तानात) धार्मिक बुद्धी नसते. तो मर्यादेचे पालन करीत नाही कारण तो स्वतः विनामर्यादेने उत्पन्न झाला आहे. म्हणून त्याचे स्वतःचे कुलधर्म नसल्याने तो त्याचे पालन करीत नाही. कुलधर्म अर्थात् कुलमर्यादेच्या विरुद्ध आचरण करतो.

ज्यांनी आपल्या कुलाचा युद्धात संहार केला, त्यांना ''कुलघातकी'' म्हणतात. वर्णसंकर अशा कुलघातक्यांना नरकात घेऊन जातो. केवळ कुलघातक्यालाच नाही तर कुलपरंपरा नष्ट झाल्याने संपूर्ण कुलालाच तो नरकामध्ये घेऊन जातो.

**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः**—ज्यांनी आपल्या कुलाचा नाश केला आहे, अशा या कुलघातक्यांच्या पितरांना वर्णसंकराकडून श्राद्ध आणि तर्पण न मिळाल्याने त्या पितरांचे पतन होते. कारण की, जेव्हा पितरांना श्राद्ध आणि तर्पणद्वारा पिंडदान दिले जाते. तेव्हा ते त्या पुण्याच्या प्रभावाने उच्च लोकांत राहतात. परंतु जेव्हा त्यांना श्राद्ध तर्पणद्वारा पिंडदान देणे बंद होते. तेव्हा त्यांचे त्या स्थानाहून पतन होते. अर्थात् ते त्या उच्च लोकांत राहत नाहीत.

पितरांना श्राद्ध व तर्पणद्वारा पिंडदान न मिळण्याचे कारण असे आहे की, वर्णसंकराची पूर्वजाविषयी आदर बुद्धी नसते. याकारणाने त्यांच्यात पितरासाठी श्राद्ध तर्पण करण्या-विषयी भावनाच राहत नाही. जरी लोकापवादाचा विचार करून त्यांनी श्राद्ध तर्पणही केले. तरीही शास्त्र विधीनुसार त्यांचा श्राद्ध तर्पण करण्यात अधिकार नसल्याने ते श्राद्धतर्पण-द्वारा केलेले पिंडदान पितरांना मिळतच नाही. अशा प्रकारे जेव्हा पितरांना आदरबुद्धीने आणि शास्त्र-विधीनुसार पिंड-पाणी मिळत नाही तेव्हा त्यांचे आपल्या स्थानातून पतन होते.

**परिशिष्ट भाव**—पितरांमध्ये एक 'आजान' पितर असतात आणि एक 'मर्त्य' पितर. पितरलोकात राहणारे पितर 'आजान' आहेत आणि मनुष्यलोकातून मृत्यू होऊन गेलेले पितर 'मर्त्य' आहेत. श्राद्ध आणि तर्पण न मिळाल्यास मर्त्य पितरांचे पतन होते. पतन त्याच मर्त्य पितरांचे होते ज्यांचा कुटुंबाशी, संतानाशी संबंध राहतो आणि त्यांच्याकडून श्राद्ध-तर्पणाची आशा ठेवतात.

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसङ्करकारकैः।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

---

( * परस्पर विरोधी धर्माचे मिश्रण होवून जे उत्पन्न होते त्याला ''संकर'' म्हणतात. जेव्हा कर्तव्याचे पालन होत नाही तेव्हा धर्मसंकर, वर्णसंकर, जातिसंकर, कुलसंकर, वेशसंकर, भाषासंकर, आहारसंकर, इत्यादी अनेक संकर-दोष उत्पन्न होतात.

**एतैः** = या
**वर्णसङ्करकारकैः** = वर्णसंकरकारक
**दोषैः** = दोषांनी
**कुलघ्नानाम्** = कुलघातक्यांचे
**शाश्वताः** = सनातन
**कुलधर्माः** = कुलधर्म
**च** = आणि
**जातिधर्माः** = जातीधर्म
**उत्साद्यन्ते** = नष्ट होतात.

*व्याख्या*— **दोषैरेतैः कुलघ्नानाम्.........कुलधर्माश्च शाश्वताः**—युद्धात कुलाचा नाश झाल्याने पूर्वापार चालत आलेले कुलधर्मही नष्ट होतात. कुलधर्म नष्ट झाल्याने कुळात अधर्माची वृद्धी होते. अधर्माची वृद्धी झाल्यास स्त्रीया दूषित होतात. स्त्रीया दूषित झाल्याने वर्णसंकर उत्पन्न होतात. अशाप्रकारे या वर्णसंकरकारक दोषामुळे कुलाचा नाश करणाऱ्यांचे जातिधर्म (वर्णधर्म) नष्ट होतात.

कुलधर्म आणि जातिधर्म कशाला म्हणतात? एकाच जातीमधील एका कुलाची जी स्वतः ची वेगवेगळी परंपरा असते, वेगवेगळे रीतिरिवाज, मर्यादा आणि आचरणे असतात. ते सर्व त्या कुलाचे ''कुलधर्म'' म्हटले जातात. एकाच जातीमधील संपूर्ण कुलसमुदायांचे जे धर्म असतात त्या सर्वांना ''जातिधर्म'' अर्थात् ''वर्णधर्म'' म्हणतात, जे सामान्य धर्म असतात आणि शास्त्रविधि-अनुकूल असतात. या कुलधर्मांचे आणि जातिधर्माचे आचरण न झाल्याने हे धर्म नष्ट होतात.

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन।**
**नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम॥ ४४॥**

**जनार्दन** = हे जनार्दन!
**उत्सन्नकुलधर्माणाम्** = ज्यांचे कुलधर्म नष्ट होतात,
**मनुष्याणाम्** = (त्या) मनुष्यांचा
**अनियतम्** = अनंत कालापर्यंत
**नरके** = नरकांत
**वासः** = वास
**भवति** = होतो,
**इति** = असे (आम्ही)
**अनुशुश्रुम** = ऐकत आलो आहोत.

*व्याख्या*— **उत्सन्नकुलधर्माणाम्.........अनुशुश्रुम**— *भगवंतांनी मनुष्याला विवेक दिला आहे, नवीन कर्म करण्याचा अधिकार दिला आहे. म्हणून तो कर्म करण्यात अथवा न करण्यात, चांगले करण्यात अथवा वाईट करण्यात स्वतंत्र आहे. म्हणून त्याने सर्वकाळ विवेक-विचारपूर्वक कर्तव्यकर्म करावयास पाहिजे. परंतु मनुष्य सुखभोगाच्या लोभामध्ये फसून आपल्या विवेकाचा अनादर करतो आणि रागद्वेषाला वश होतो. ज्या कारणाने त्याचे आचरण शास्त्र आणि कुलमर्यादांच्या विरुद्ध होऊ लागते. परिणामी त्याची इहलोकात निंदा, अपमान, तिरस्कार होतो आणि परलोकात दुर्गती, नरकांची प्राप्ती होते. आपल्या पापामुळे त्यांना अनंत-काळापर्यंत नरकयातना भोगाव्या लागतात. असे आम्ही परंपरेने वडिलधाऱ्यांकडून आणि गुरुजनांकडून ऐकत आलो आहोत.

**मनुष्याणाम्**—या पदात कुलघातक्यांचा आणि त्यांच्या कुळातील सर्व मनुष्यांचा समावेश केला गेला आहे. अर्थात् कुलघातक्यांच्या (मागील) पूर्वजांचा आणि (पुढील) वंश-जांचा समावेश केला गेला आहे.

***संबंध***—*युद्धाने होणाऱ्या अनर्थाच्या वर्णनाचा स्वतः अर्जुनावर काय परिणाम झाला याचे वर्णन या नंतरच्या श्लोका-मध्ये सांगतात.*

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः॥ ४५॥**

**अहो** = ही मोठी आश्चर्याची (आणि)
**बत** = दुःखाची गोष्ट आहे की,
**वयम्** = आम्ही
**महत्पापम्** = फार मोठे पाप
**कर्तुम्** = करण्याचा
**व्यवस्थिताः** = निश्चय केल आहे
**यत्** = तो की,
**राज्यसुखलोभेन** = राज्य आणि सुखाच्या लोभाने
**स्वजनम्** = आपल्या स्वजनांना
**हन्तुम्** = मारण्यासाठी
**उद्यताः** = तयार झालो आहोत.

* शोकविव्हल झाल्याकारणानेच अर्जुनाने याठिकाणी ''अनुशुश्रुम'' परोक्ष लिट् क्रियेचा प्रयोग केला आहे.

*व्याख्या*— **अहो बत.............स्वजनमुद्यताः**—हे दुर्योधनादी दुष्ट आहेत. यांची धर्मावर श्रद्धा नाही. यांच्यावर लोभाचा पगडा बसला आहे. म्हणून ते युद्धासाठी तयार झाले तर यात काही आश्चर्याची गोष्ट नाही. परंतु आम्ही तर धर्म-अधर्माला, कर्तव्य-अकर्तव्याला, पुण्य-पापाला जाणणारे आहोत. असे जाणकार असूनही न जाणणाऱ्या माणसाप्रमाणे आम्ही लोकांनी फार मोठे पाप करण्याचा निश्चय केला आहे. एवढेच नव्हे तर, युद्धात आपल्या स्वजनांना मारण्यासाठी शस्त्रास्त्र घेऊन तयार झालो आहोत. ही आम्हा लोकांसाठी फारच मोठ्या आश्चर्याची आणि खेदाची गोष्ट आहे. अर्थात् सर्वथैव अनुचित गोष्ट आहे.

आम्हाला जी माहिती आहे. आम्ही जी शास्त्रवचने ऐकली आहेत आणि गुरुजनांकडून जी विद्या प्राप्त केली आहे, आपले जीवन सुधारण्याचा विचार केला आहे, त्या सर्वांचा अनादर करून आज आम्ही युद्धरूपी पाप करण्याचा विचार केला आहे. हे फार मोठे पाप आहे. "**महत्पापम्**".

या श्लोकात "**अहो**" आणि "**बत**" ही दोन पदे आली आहेत. यांपैकी "**अहो**" पद आश्चर्यवाचक आहे. आश्चर्य हेच आहे की, युद्धापासून होणाऱ्या अनर्थ परंपरेला जाणत असून सुद्धा आम्ही लोकांनी युद्धरूपी फार मोठे पाप करण्याचा पक्का निश्चय केला आहे. दुसरे "**बत**" पद खेद वाचक आहे. दुःख हेच आहे की, अल्पकाल टिकणाऱ्या राज्यासाठी आणि सुखाच्या लोभात फसून आम्ही आपल्याच कुटुंबियांना मारण्यासाठी तयार झालो आहोत.

केवळ राज्य आणि सुखाच्या लोभामुळेच आम्ही पाप करण्याचा निश्चय करून स्वजनांना ठार करण्यासाठी तयार झालो आहोत. तात्पर्य, आमचा जर युद्धात विजय होईल तर आम्हाला राज्य, वैभव मिळेल, आमचा आदर सत्कार होईल, आमचे महत्त्व वाढेल, संपूर्ण राज्यावर आमचा प्रभाव राहील, सर्व ठिकाणी आमचा हुकूम चालेल, आमच्याजवळ संपत्ती असल्याने आम्ही मनसोक्त भोगसामुग्रीचा संग्रह करू, नंतर खूप आराम घेऊ, सुख भोगू—अशाप्रकारे आमच्यावर राज्य आणि सुखाचा पगडा पसरला आहे. जो आमच्या सारख्या-साठी सर्वथैव अनुचित आहे.

या श्लोकात अर्जुन हे सांगू इच्छितात की, आपल्या सद्विचारांचा, माहितीचा आदर केल्यानेच मनुष्य, शास्त्र, गुरुजन इत्यादींची आज्ञा पाळू शकतो. परंतु जो मनुष्य आपल्या सद्विचारांचा अनादर करतो, तो शास्त्राच्या, गुरुजनांच्या आणि सिद्धांताच्या उत्तम तत्त्वांना ऐकूनही त्यांना धारण करू शकत नाही. आपल्या सद्विचारांचा वारंवार अनादर-तिरस्कार केल्याने सद्विचारांची निर्मिती होत नाही. मग मनुष्याला दुर्गुण-दुराचारापासून कोण रोखणार? तसेच जर आम्ही आमच्या जाणकारीचा आदर केला नाही, तर मग आम्हाला अनर्थपरंपरेपासून कोण रोखू शकेल? अर्थात् कोणीही रोखू शकत नाही.

येथे अर्जुनाची दृष्टी युद्धरूपी क्रियेकडे आहे. ते युद्धरूपी क्रियेला दोषी समजून त्यापासून बाजूला जाऊ इच्छितात. परंतु वास्तविक दोष कोणता आहे, याकडे अर्जुनाची दृष्टी नाही. युद्धात कौटुंबिक मोह, स्वार्थभाव, कामना हे दोष आहेत. पण याकडे दृष्टी न गेल्याने अर्जुन येथे आश्चर्य आणि खेद प्रगट करीत आहेत. जो वास्तविक कोणत्याही विचारशील, धर्मात्मा, शूरवीर क्षत्रियासाठी उचित नाही.

[अर्जुनाने पूर्वी अडतीसाव्या श्लोकात दुर्योधनादिकांच्या युद्धात प्रवृत्त होण्यास, कुलक्षयाच्या दोषाला आणि मित्र-द्रोहाच्या पापाला लोभ हे कारण दाखविले आणि येथेही स्वतः राज्य आणि सुखाच्या लोभामुळे महान पाप करण्या-विषयी सज्ज झाल्याचे बोलत आहेत. यावरुन सिद्ध होते की, अर्जुन "पाप" होण्यात लोभाला हेतू मानतात. असे असूनही पुढे तिसऱ्या अध्यायाच्या छत्तीसाव्या श्लोकात अर्जुनाने "माणूस इच्छा नसतानाही पापाचे आचरण का करतो"? असा प्रश्न का केला याचे समाधान असे आहे की, येथे तर कौटुंबिक मोहामुळे अर्जुन युद्धापासून निवृत्त होण्यास धर्म आणि युद्धाच्या प्रवृत्तीस अधर्म मानत आहेत. अर्थात् त्यांची शरीरादीविषयी लौकिकदृष्टी आहे. म्हणून ते युद्धात स्वजनांना ठार करण्यात लोभ हा हेतू मानत आहेत. परंतु पुढे गीतेचा उपदेश ऐकता-ऐकता त्यांना आपल्या कल्याणाविषयीची इच्छा जागृत झाली (गीता ३।२) म्हणून ते कर्तव्याचा त्याग करून न करण्यायोग्य कामामध्ये प्रवृत्त होण्यास कोण कारण आहे—असे विचारतात अर्थात् तेथे (३।३६ मध्ये) अर्जुन कर्तव्याच्या दृष्टीने, साधकाच्या दृष्टीने विचारत आहेत.]

**संबंध**—*आश्चर्य आणि खेदात निमग्न झालेले अर्जुन पुढील श्लोकात आपल्या युक्तींचा शेवटचा निर्णय सांगतात*

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्॥ ४६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यदि** | = जरी (या) | **रणे** | = युद्धभूमीत | **हन्युः** | = ठारही केले (तरी) |
| **शस्त्रपाणयः** | = हातात घेतलेल्या शस्त्रास्त्रांनी | **अप्रतीकारम्** | = सामना न करणाऱ्या | **तत्** | = ते |
| | | | | **मे** | = माझ्यासाठी |
| **धार्तराष्ट्राः** | = धृराष्ट्राच्या पक्षाकडील लोकांनी | **अशस्त्रम्** | = (तसेच) शस्त्ररहित | **क्षेमतरम्** | = फारच कल्याणकारी |
| | | **माम्** | = (असलेल्या) मला | **भवेत** | = होईल. |

*व्याख्या*— **यदि माम्......क्षेमतरं भवेत्**—अर्जुन म्हणतात की, जर मी युद्धापासून संपूर्णपणे निवृत्त होईल, तर कदाचित हे दुर्योधनइत्यादीही युद्धापासून निवृत्त होतील. कारण आम्ही काही इच्छिलेच नाही, लढलोच नाही, तर मग हे लोक युद्ध करतीलच कशाला? परंतु कदाचित आवेशात येऊन तसेच हातात शस्त्र धारण करून हे धृतराष्ट्राचे पक्षपाती लोक "आपल्या मार्गातील कायमचाच काटा काढून टाकावा, वैरी समाप्त होऊन जावा" असा विचार करून सामना न करणाऱ्या तसेच शस्त्ररहित असलेल्या मला ठार जरी करतील, तरी त्यांचे ते ठार करणे माझ्यासाठी कल्याणकारकच होईल. कारण की, मी युद्धात गुरुजनांना ठार करून भयंकर पाप करण्याचा जो निश्चय केला होता त्या निश्चयरूप पापाचे प्रायश्चित होऊन जाईल; त्या पापापासून मी शुद्ध होऊन जाईन. तात्पर्य, मी युद्ध केले नाही, तर मीही पापापासून वाचेल आणि माझ्या कुलाचाही नाश होणार नाही.

[जो मनुष्य आपल्यासाठी ज्या गोष्टींचे वर्णन करतो त्या विषयाचा त्या व्यक्तीवर परिणाम होत असतो. अर्जुनानेही जेव्हा शोकाविष्ट होऊन अठ्ठावीसाव्या श्लोकापासून बोलणे आरंभ केले तेव्हा ते तितके शोकविव्हल नव्हते. जितके ते आता शोकाविष्ट आहेत. प्रारंभी अर्जुन युद्धापासून उपरत नव्हते. पण शोकविव्हल होऊन बोलता-बोलता शेवटी ते युद्धापासून उपरत होतात आणि बाणसहित धनुष्याचा त्याग करून बसतात. भगवंतांनी विचार केला की, अर्जुनाच्या बोलण्याचा वेग थांबल्यावरच आपण बोलावे. अर्थात् बोलण्याने अर्जुनाचा शोक निघून जावा. अंतःकरणात कसलाही शोक शिल्लक राहिला नाही, तरच माझ्या बोलण्याचा त्याच्यावर परिणाम होईल. म्हणून भगवंत अर्जुन बोलत असताना मध्ये काहीच बोलले नाहीत.]

## विशेष गोष्ट

आतापर्यंत अर्जुनाने आपल्याला धर्मात्मा समजून युद्धापासून निवृत्त होण्याविषयी जो युक्तिवाद केला आहे, त्यालाच संसारात आसक्त असलेले लोक ठीक समजतील आणि पुढे भगवान् अर्जुनाला ज्या गोष्टी सांगणार आहेत. त्या योग्य पद्धतीने समजू शकणार नाहीत. याचे कारण असे आहे की, जो मनुष्य ज्या स्थितीत असतो त्या स्थितीची, त्या श्रेणीची गोष्टच तो ठीक समजतो. तो उच्च श्रेणीची गोष्ट समजूच शकत नाही. अर्जुनाच्या अंतःकरणात कुटुंबाचा मोह आहे आणि त्या मोहाने आविष्ट होऊनच ते धर्माच्या, साधुतेच्या फारच चांगल्या गोष्टीचे प्रतिपादन करीत आहेत. म्हणून ज्या लोकांच्या अंतःकरणात कुटुंबाचा मोह आहे त्या लोकांनाच अर्जुनाचे म्हणणे योग्य वाटेल. परंतु भगवंताची दृष्टी जीवाच्या कल्याणाकडे आहे की, त्याचे कल्याण कसे होईल? भगवंताच्या या उच्च श्रेणीच्या दृष्टीला ते (लौकिक दृष्टी असणारे) लोक समजूच शकत नाहीत. म्हणून ते भगवंताच्या म्हणण्याला योग्य समजणार नाहीत. उलट असे समजतील की, अर्जुनासाठी युद्धरूपी पापापासून वाचणेच योग्य होते. परंतु भगवंतांनी त्यांना युद्धात प्रवृत्त करून ठीक केले नाही.

वास्तविक भगवंतांनी अर्जुनाकडून युद्ध करविले नाही; तर त्यांना आपल्या कर्तव्याचे ज्ञान करविले आहे. युद्ध तर अर्जुनाला कर्तव्यरूपाने आपोआपच प्राप्त झाले होते. म्हणून युद्धाचा विचार अर्जुनाचा स्वतःचाच होता. ते स्वतःच युद्धाला प्रवृत्त झाले होते. म्हणूनच तर त्यांनी भगवंतांना निमंत्रित केले होते. परंतु त्या विचाराला आपल्या बुद्धीनेच अनिष्टकारक समजून ते युद्धापासून विन्मुख होत होते. अर्थात् आपल्या कर्तव्यापासून दूर चालले होते. यावर भगवंतांना म्हटले की "तू युद्ध करू इच्छित नाहीस. हा तुझा मोह आहे" म्हणून समयानुसार जे कर्तव्य सहज प्राप्त झालेले असते. त्याचा त्याग करणे उचित नाही.

कोणी एक मनुष्य बद्रीनारायणाला चालला होता. परंतु वाटेत त्याची दिशाभूल झाली. अर्थात् त्याने दक्षिणेला उत्तर आणि उत्तरेला दक्षिण समजले. म्हणून तो बद्रीनारायणाकडे न जाता उलट चालू लागला. समोरून एक मनुष्य आला, त्याला भेटला. त्या माणसाने विचारले "बाबा, आपण कोठे जात आहात?" तेव्हा तो म्हणाला "बद्रीनारायण"! वाटेत भेटलेला माणूस म्हणतो "बाबा, बद्रीनारायण इकडे नाही. तिकडे आहे. आपण तर उलट जात आहात". म्हणून त्या माणसाने यात्रेकरूला बद्रीनारायणाला पाठविले नाही तर त्याला दिशेचे ज्ञान करवून योग्य मार्ग दाखविला. तसेच

भगवान् अर्जुनाला आपल्या कर्तव्याचे ज्ञान करून देतात. युद्ध करावयास लावीत नाहीत.

स्वजनांना पाहून अर्जुनाच्या मनात ही गोष्ट आली होती की, मी युद्ध करणार नाही. "**न योत्स्ये**" (२।९) परंतु भगवंताचा उपदेश ऐकून असे म्हटले नाही की, "मी युद्ध करणार नाही". तर असे म्हटले की "मी आपल्या आज्ञेचे पालन करील". "**करिष्ये वचनं तव**" (१८।७३) अर्थात् आपले कर्तव्य पार पाडीन. अर्जुनाच्या या वचनावरुन सिद्ध होते की, भगवंतांनी अर्जुनाला आपल्या कर्तव्याचे ज्ञान करविले आहे.

वास्तविक युद्ध होणे अवश्यंभावी होते. कारण सर्वांची आयुष्ये संपलेली होती. त्याला कोणीही टाळू शकत नव्हते. स्वत: भगवंतांनी विश्वरूपदर्शनाचे वेळी अर्जुनास म्हटले आहे की "मी विशाल झालेला काळ आहे आणि सर्वांचा संहार करण्यासाठी येथे आलो आहे. म्हणून तुझ्या युद्ध करण्यावाचूनही हे परपक्षात उभे असलेले योद्धे वाचणार नाहीत" (११।३२) म्हणून हा नरसंहार नक्कीच विधिलिखितानुसार होणार होता. हा नरसंहार जरी अर्जुनाने युद्ध केले नसते तरीही होणारच होता. जर अर्जुनाने युद्ध केले नसते पण ज्यांनी मातेच्या आज्ञेने द्रौपदीशी आपल्यासह पाच बांधवांचा विवाह करणे स्वीकार केले होते ते युधिष्ठिर मातेच्या युद्धाच्या आज्ञेनुसार तर युद्ध अवश्य करणारच होते. भीमसेन देखील युद्धातून मागे सरकणारे नव्हते. कारण त्यांनी कौरवांना मारण्याची प्रतिज्ञा केली होती. द्रौपदीने तर असे म्हटले होते की जर, माझे पती (पांडव) कौरवाशी युद्ध करणार नसतील तर माझे पिता (द्रुपद), भाऊ (धृष्टद्युम्न) आणि माझे पाच पुत्र तसेच अभिमन्यु कौरवांशी युद्ध करतील.* अशा प्रकारची अनेक कारणे होती ज्यामुळे युद्ध टळणे असंभव होते.

विधिलिखितास थांबविणे मनुष्याच्या हातची गोष्ट नाही. परंतु आपल्या कर्तव्याचे पालन करून मनुष्य आपला उद्धार करू शकतो आणि कर्तव्यच्युत होऊन आपले पतन करू शकतो. तात्पर्य, मनुष्य आपले इष्ट-अनिष्ट करण्यास स्वतंत्र आहे. म्हणून भगवंतांनी अर्जुनाला कर्तव्याचे ज्ञान करवून मनुष्यमात्राला उपदेश केला आहे की, त्याने शास्त्राज्ञेनुसार आपल्या कर्तव्याचे पालन करण्यात तत्पर असले पाहिजे. त्यापासून कधीही पाठ फिरवू नये.

***संबंध**—पूर्व श्लोकात अर्जुनाने आपल्या युक्तिवादाचा निर्णय सांगितला. त्यानंतर अर्जुनाने काय केले हे संजय पुढील श्लोकात सांगत आहेत.*

*सञ्जय उवाच*

## एवमुक्त्वार्जुनः सङ्ख्ये रथोपस्थ उपाविशत्।
## विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥ ४७॥

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **एवम्** | = असे | **अर्जुनः** | = अर्जुन | **साङ्ख्ये** | = युद्धभूमीत |
| **उक्त्वा** | = म्हणून | **सशरम्** | = बाणसहित | **रथोपस्थे** | = रथाच्या मध्यभागी |
| **शोकसंविग्नमानसः** | = शोकाकुल मन झालेले | **चापम्** | = धनुष्याचा | | |
| | | **विसृज्य** | = त्याग करून | **उपाविशत्** | = बसले. |

*व्याख्या*— **एवमुक्त्वार्जुनः.....शोकसंविग्नमानसः**— युद्ध करणे संपूर्ण अनर्थाचे मूळ कारण आहे, युद्ध करण्याने येथे कुटुंबियांचा नाश होईल, परलोकात नरकाची प्राप्ती होईल. इत्यादी गोष्टींना युक्ती आणि प्रमाणांनी सांगून शोकाने अत्यंत व्याकूळ झालेल्या अर्जुनाने युद्ध न करण्याचा पक्का निर्णय केला. ज्या रणभूमीमध्ये ते हातामध्ये धनुष्य घेऊन उत्साहाने आले होते. त्याच रणभूमीत त्यांनी आपल्या डाव्या हातातील गाण्डीव धनुष्य आणि उजव्या हातातील बाण खाली ठेवला आणि स्वत: आपण रथाच्या मध्यभागी अर्थात् दोन्ही सैन्याला पाहण्यासाठी जेथे उभे होते. त्याचठिकाणी शोकविव्हल स्थितीत बसले.

अर्जुनाची अशी शोकाकुल अवस्था होण्यात मुख्य कारण आहे—भगवंतांचे भीष्माचार्य आणि द्रोणाचार्यासमोर रथ उभा करून अर्जुनाला कुरुवशीयांना पाहण्याविषयी

* यदि भीमार्जुनौ कृष्ण कृपणौ सन्धिकामुकौ। पिता मे योत्स्यते वृद्धः सह पुत्रैर्महारथैः॥
पञ्च चैव महावीर्याः पुत्रा मे मधुसूदन। अभिमन्युं पुरस्कृत्य योत्स्यन्ते कुरुभिः सह॥

(महाभारत, उद्योग० ८२।३७-३८)

म्हणणे आणि त्यांना पाहून अर्जुनाच्या अंत:करणात असलेला सुप्त मोह जागृत होणे. मोह जागृत झाल्याने अर्जुन म्हणतात की, युद्धात आमचे कुटुंबीय मारले जातील. कुटुंबियांचे मरणे हीच फार नुकसानीची गोष्ट आहे. दुर्योधन इत्यादी तर लोभामुळे या नुकसानीकडे पाहत नाहीत. परंतु युद्धाने केवढी अनर्थ परंपरा ओढवेल—याकडे लक्ष ठेवून आम्ही लोकांनी अशा पापापासून निवृत्त झालेच पाहिजे. आम्ही राज्य आणि सुखाच्या लोभाने कुलाचा संहार करण्यासाठी रणभूमीत उभे राहिलो आहोत. ही आम्ही फार मोठी चूक केली. म्हणून युद्धास तयार नसलेल्या व शस्त्ररहित असलेल्या मला जरी समोर उभे असलेल्या योद्ध्यांनी ठार केले. तरी त्यापासून माझे हितच होईल. अशा प्रकारे अंत:-करणात मोहाने घर केल्यामुळे अर्जुन युद्धापासून उपरत होण्यात तसेच आपला मृत्यू होण्यातही कल्याण पाहत आहेत आणि शेवटी त्याच मोहामुळे बाणसहित धनुष्याचा त्याग करून विषादमग्र होऊन बसतात. हा मोहाचाच महिमा आहे की, जे अर्जुन धनुष्य घेऊन युद्धासाठी तयार झाले होते तेच अर्जुन धनुष्य खाली ठेवून शोकाने व्याप्त झाले आहेत.

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्याय: ॥ १ ॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् या भगन्नामाच्या उच्चारण पूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीता उपनिषद्रूपी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील ''अर्जुन विषाद योग'' या नावाचा हा पहिला अध्याय समाप्त झाला ॥ १ ॥**

प्रत्येक अध्यायाच्या शेवटी महर्षी भगवान् श्री वेदव्यासजींनी जी उपरोक्त पुष्पिका लिहिली आहे तिच्या मधून त्यांनी श्रीमद्भगवद्गीतेचे विशेष माहात्म्य आणि प्रभाव-च प्रगट केला आहे.

**ॐ तत् सत्**— *ही तीनही सच्चिदानंदघन परमात्म्याची पवित्र नावे आहेत. ही सर्व जीवांचे कल्याण करणारी आहेत. यांचा उच्चार केल्याने मनुष्य परमात्म सम्मुख होतो आणि शास्त्रविहित कर्तव्य कर्माचे अंग-वैगुण्य नाहीसे होते. म्हणून गीतेच्या अध्यायाचा पाठ करण्यात, श्लोक, पद आणि अक्षरांच्या उच्चारण्यात ज्या ज्या उणीवा झाल्या असतील त्यांचे परिमार्जन करण्यासाठी आणि संसाराशी संबंध-विच्छेदपूर्वक भगवत्संबंधाची आठवण येण्यासाठी प्रत्येक अध्यायाच्या शेवटी ''**ॐ तत्सत्**'' चे उच्चारण केले गेले आहे

महर्षी वेदव्यासद्वारा प्रत्येक अध्यायाच्या शेवटी '**ॐ**' चे उच्चारण करण्याचे तात्पर्य हे आहे की, माझ्या रचनेतील अङ्ग-वैगुण्य नाहीसे व्हावे '**तत्**' च्या उच्चारणाचे तात्पर्य हे आहे की, माझी रचना भगवत्प्रीत्यर्थ व्हावी आणि '**सत्**' च्या उच्चारणाचे तात्पर्य हे आहे की, माझी रचना सत् अर्थात् अविनाशी फल देणारी व्हावी. ''**इति**'' बस, हेच माझे प्रयोजन आहे. या व्यतिरिक्त माझे व्यक्तिगत काहीही प्रयोजन नाही.

जे '**श्रीमत्**' अर्थात् सर्वशोभा संपन्न आहेत आणि ज्यांच्या ठिकाणी संपूर्ण ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य हे सहा ''भग'' नित्य विद्यमान असतात अशा भगवंताच्या मुखातून प्रगट झालेली असल्याने हिला ''**श्रीमत् भगवत्**'' म्हटले गेले आहे.

जेव्हा मनुष्य मस्तीत, आनंदात असतो तेव्हा त्याच्या मुखातून सहज गीत गुण-गुणले जाते. भगवंतांनी हिला मस्तीत येऊन गाईले आहे. म्हणून हिचे नाव ''**गीता**'' झाले. जरी संस्कृत व्याकरणाच्या नियमानुसार हिचे नाव ''**गीतम्**'' असावयास पाहिजे होते तरीपण उपनिषद्-स्वरूप असल्याने स्त्रीलिंग शब्द ''**गीता**'' चा प्रयोग केला गेला आहे

यात संपूर्ण उपनिषदांचे सारतत्त्व संगृहीत केले आहे आणि ही स्वत: च भगवंताची वाणी असल्याने उपनिषद्-स्वरूप आहे. म्हणून हिला ''**उपनिषद्**'' म्हटले गेले आहे.

वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादींचा आग्रह न ठेवून प्राणिमात्राचे कल्याण करणारी सर्वश्रेष्ठ विद्या असल्याने हिचे नाव ''**ब्रह्मविद्या**'' आहे. ह्या ब्रह्मविद्यास्वरूप गीतेमध्ये कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग, भक्तियोग इत्यादी योग-साधनांची प्रणाली दिली आहे, ज्याद्वारा साधकाला परमात्म्याशी आपल्या नित्य संबंधाचा अनुभव व्हावा म्हणून हिला ''**योगशास्त्र**'' म्हटले गेले आहे.

हा साक्षात् पुरुषोत्तम भगवान् श्रीकृष्ण आणि भक्त-प्रवर अर्जुनाचा संवाद आहे. अर्जुनाने नि:संकोचभावाने प्रश्न केले आहेत आणि भगवंतांनी उदारतेने त्यांची उत्तरे दिली आहेत. त्या उभयतांचे भाव यात आहेत म्हणून या दोघांच्या नावाने या गीताशास्त्राचा विशेष महिमा असल्याने हिला ''**श्रीकृष्णार्जुनसंवाद**'' नावाने संबोधले आहे.

या पहिल्या अध्यायात अर्जुनाच्या विषादाचे वर्णन

* पहा—गीता अध्याय क्रमांक १७। २३-२७

आहे. हा विषाद सुद्धा भगवान् अथवा संतांचा संग झाल्यास संसाराविषयी वैराग्य निर्माण करून कल्याण करणारा होतो. दुर्योधनादिकांनाही जरी विषाद झाला आहे. तरीपण ते भगवंताशी विमुख असल्याने त्यांचा विषाद "योग" झाला नाही. केवळ अर्जुनाचा विषादच भगवंताशी सम्मुख होण्याने "**योग**" अर्थात् भगवंताशी नित्य-संबंधाचा अनुभव करणारा झाला. म्हणून या अध्यायाचे नांव "अर्जुनविषादयोग" ठेवले गेले आहे.

प्रत्येक अध्यायाच्या शेवटी पुष्पिका देण्याचे तात्पर्य असे आहे की, जर साधक एका अध्यायाचाही योग्य रीतीने पठन-पाठन विचार करील तर त्या एकाच अध्यायाने त्याचे कल्याण होईल.

**परिशिष्ट भाव**—गीतेच्या पुष्पिकेत '**ब्रह्मविद्यायाम्**', '**योगशास्त्रे**' आणि '**श्रीकृष्णार्जुनसंवादे**' हे तीन पद तर एकवचनात आले आहेत, परंतु '**श्रीमद्भगवद्गीतासु**' आणि '**उपनिषत्सु**'—हे दोन पद बहुवचनात आले आहेत. याचे तात्पर्य हे आहे की, भगवद्वाणी संपूर्ण उपनिषदांत श्रीमद्भगवद्गीताही एक उपनिषद् आहे, ज्यात 'ब्रह्मविद्या' (ज्ञानयोग), 'योगशास्त्र' (कर्मयोग) आणि 'श्रीकृष्णार्जुनसंवाद' (भक्तियोग)—तिन्ही आले आहेत.

गीतेत 'श्रीकृष्णार्जुनसंवाद' याचा आरंभ आणि अंत भक्तीतच झाला आहे. आरंभी अर्जुन किंकर्तव्यविमूढ होऊन भगवंताला शरण होतात. '**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्**' (२।७) आणि अंती भगवान्द्वारा '**मामेकं शरणं व्रज**' पदांनी पूर्ण शरणागतीची प्रेरणा केल्यावर अर्जुन पूर्णपणे शरणागत होतात.—'**करिष्ये वचनं तव**' (१८।७३). अर्जुनाने स्वतःच्या श्रेयाचा (कल्याणाचा) उपाय विचारला होता (२।७, ३।२, ५।१), म्हणून भगवंताने गीतेत 'ज्ञानयोग' आणि 'कर्मयोग' याचेही वर्णन केले आहे.

## पहिल्या अध्यायाचे पद, अक्षर आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ प्रथमोऽध्यायः**" ची तीन, "**धृतराष्ट्र उवाच**", "**संजय उवाच**" इत्यादी पदांची बारा, श्लोकांची पाचशे अठ्ठावन्न आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग पाचशे शहाऐंशी आहे

(२) या अध्यायात "**अथ प्रथमोऽध्यायः**" ची सात, "**धृतराष्ट्र उवाच**", "**संजय उवाच**" इत्यादी पदांची सदतीस, श्लोकांची एक हजार पाचशे चार आणि पुष्पिकेची अठ्ठेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एक हजार पाचशे शहाण्णव आहे. ह्या अध्यायातील सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात सहा "उवाच" आहेत. एक "**धृतराष्ट्र उवाच,**" तीन "**संजय उवाच**" आणि दोन "**अर्जुन उवाच**"

## पहिल्या अध्यायात प्रयुक्त छंद

या अध्यायाच्या सत्तेचाळीस श्लोकांपैकी पाचव्या आणि तेहतीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये तसेच त्रेचाळीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये 'रगण' योजिलेला आहे त्यामुळे "**र-विपुला**" आणि पंचवीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात तसेच नवव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "नगण" योजला असल्याने "**न विपुला**" संज्ञेचे छंद आहेत. बाकीचे बेचाळीस श्लोक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदाच्या लक्षणाने युक्त आहेत.